


# नवभारत

जून २००८



"आशा, प्रेम व कणव यांनी भरलेली दृष्टी घेऊन द्वेष, अत्याचार व भडकलेला सूड यांनी होरपळलेल्या नोआखलीतून हिंडणाऱ्या गांधींचे चित्र मनामध्ये आले की, मला एच्.जी.वेल्स् याच्या 'द कंट्री ऑफ द ब्लाइंड' या कथेची आठवण येते. त्या गोष्टीतील डोळस नायक अचानक एका आंधळयांच्या गावात आला. आपल्याला दिसणारे निळे आकाश, हिरवी झाडी, सोनेरी ऊन यांची वर्णने तो करू लागला. लोकांनी त्याला वेडे ठरविले आणि डोळयांमुळे हे वेड त्याच्या डोक्यात भरले असे निदान करून त्या आंधळया लोकांनी त्याचे डोळे काढण्याचे ठरविले."







अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६१ । अंक ९ । जून २००८
वैशाख/ज्येष्ठ शके १९३०
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

**प्राज्ञपाठशाळामंडळ**
**अध्यक्ष व विश्वस्त :**
सरोजा भाटे

**संपादक :**
श्री. मा. भावे

**संपादक मंडळ :**
वसंत पळशीकर, सुधीर रसाळ,
सीताराम रायकर, यशवंत कळमकर

**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).





अनुक्रमणिका








# नवभारत

मे २००८

अनुक्रमणिका



लेखकांचा परिचय


❑ **प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभाग प्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पी.एच्.डी. व पदवीत्त्युर संशोधन; शिक्षक चळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान विषयावर २५ शोधनिबंध प्रसिद्ध.

*पत्ता :* ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११ ००४.

❑ **प्रा. कमलाकर दीक्षित**

इंग्रजीचे सेवानिवृत्त प्राध्यापक, रत्नाप्पा कुंभार कॉलेज ऑफ कॉमर्स, कोल्हापूर; लेखन, संपादन, समीक्षा व ललितलेखन, तसेच विविध नियतकालिकांमध्ये स्फुटलेखन केले आहे.

*पत्ता :* ३, रश्मी अपार्टमेंट, राबाडे कंपाउंड, कावळा नाका, कोल्हापूर ४१६ ००३.

❑ **श्री. अरुण रंधे**

मराठी विषयाचे माध्यमिक शाळेचे शिक्षक, जीवन विकास विद्यालय, उमरेड, जि. नागपूर; अधिव्याख्याता (वर्ग-२) या पदावर ५ वर्षे सेवा केली.

*पत्ता :* ३५, अड्याळवाले लेआऊट, इण्डेन गॅस गोडाऊनजवळ, उमरेड, जि. नागपूर ४४१२०३.

# 'लोकमान्य ते महात्मा'च्या निमित्ताने - लेखांक ६ वा

# पंचावन्न कोटी व गांधीहत्या

### श्री० मा० भावे

We must not cease to aspire... to befriend all Muslims and hold them fast as prisoners of our love... It would be a present possibility if the Hindus in their lakhs offered themselves to be cut to pieces without retaliation or anger in their hearts.

- Gandhi[1]

Congressmen should not however approach Muslims in a spirit of appeasement and flattery (khushamad). Although something like that had been done, and it might even be justifiably said that he (Gandhi) himself had partly been responsible for such an attitude, yet, his eyes were now open and he held that it had been unwise to do so. It was by safeguarding every person's legitimate interests that Congressmen could prove their genuine love for nationalism.

- Nirmal Kumal Bose

Monday 9-12-1946. Srirampur.[2]

काही वर्षांपूर्वी मी परदेशातील एका अनेक मजली उंच खाते-दुकानात (मॉल) गेलो होतो. तेथे वरच्या मजल्यांवर जाण्यासाठी फिरते पट्टे लावले होते. एका वेळी असे खाली-वर जाणारे अनेक पट्टे तिथे फिरत होते. मोठ्या संख्येने लोक येत होते. पाहिजे त्या पट्ट्यावर चढून इष्ट असणाऱ्या मजल्यावर पोचत होते. इतक्यात यंत्रणेत काय बिघाड झाला कोण जाणे, पण एक पट्टा नेहमीच्या दुप्पट किंवा तिप्पट वेगाने फिरू लागला. त्या पट्ट्यावरच्या लोकांची दाणादाण उडाली. बहुतेकांचे लक्ष आपली पावले पट्ट्यावर स्थिर ठेवण्याकडे लागले, काही जण मटकन् खाली बसले, बऱ्याच जणांची डोकी गरगरू लागली, थोड्या लोकांनी आधारासाठी एकमेकांना मिठ्या मारल्या, लहान मुले किंचाळू लागली, एक-दोघे पट्ट्यावरून ढासळून वाटेतल्या मजल्यावर फेकले गेले. माझ्यासारखी जी माणसे एका जागी बसून पट्ट्यांच्या या फेऱ्या मजेने पाहात होती ती अचंब्याने अवाकच झाली. हा झपाटा फार तर दोन मिनिटे टिकला असेल पण तिथे हजर असणाऱ्या सगळ्यांनाच विलक्षण झटका देऊन गेला.

मला वाटते मनुष्य-समूहांच्या इतिहासात असे काही कालखंड येत असावेत, जेव्हा काळाचा पट्टा त्या समाजातील जाणकारांना आणि धुरंधरांना चक्रावून टाकणाऱ्या वेगाने धावू लागत असावा. थोडक्या वर्षात तो समाज उत्कर्षाच्या शिखरावर पोचला किंवा ऱ्हासाच्या गर्तेत कोसळला, असे घडून आले असेल. आपल्याला माहीतच आहे की, माणसाच्या उत्क्रांतीच्या इतिहासात मनुष्याचा नवा मेंदू ज्यात झपाट्याने विकास पावला असा १००-१२५ वर्षांचा काळाचा तुकडा भिरभिरून गेला. तेवढ्या शतकाच्या कालावधीत माणसाला वाचा फुटली; तो निर्वाहाची साधने साठवून ठेवू लागला, दगडांवर चित्रे काढू लागला, मनुष्य एक बुद्धिमान प्राणी झाला. फ्रान्सच्या इतिहासात फ्रेंच राज्यक्रांतीपासून नेपोलियनने राज्याभिषेक करवून घेतला तेथपर्यंतचा १५ वर्षांचा काळ हा असाच 'चक्रं भ्रमति मस्तके' अशी स्थिती असलेला होता. त्यात मनुष्याच्या सामूहिक जीवनात क्वचितच आढळून

अनुक्रमणिका

येणारी उदात्ततेची शिखरे झळकली त्याप्रमाणेच त्याच्या कुटिल बुद्धीच्या अंधकारमय दऱ्याही भोवंड आणून गेल्या.

१९४० सालच्या मार्चमध्ये मुस्लिम लीगने पाकिस्तानची मागणी करणारा ठराव केला तेव्हापासून १९४८ च्या जानेवारीच्या अखेरीला गांधींची हत्त्या झाली. तोपर्यंतची ८ वर्षे अशाच प्रकारची, म्हणजे सामूहिक भोवळ आणणारी, वर्षे होती. ह्या काळातील राजकीय पटावरील प्रमुख पात्रे जी काँग्रेस, लीग व इंग्रज राज्यकर्ते या सर्वांना भ्रम झाला असावा किंवा ती पात्रे संमोहन-निद्रेच्या अमलाखाली वावरत असावीत असा तत्कालीन घडामोडींचा अभ्यास करणाऱ्याचा समज होतो. कसे ते आता पाहू.

— १ —

आपण पूर्वीच पाहिले आहे की, (लेखांक २) इथे इंग्रजी राज्य आल्यापासून राज्यकर्ते असा प्रचार करीत होते की, हिंदुस्थानातील समाज अंधश्रद्धा, रानटी रूढी, अडाणी धर्मकल्पना, कालबाह्य अर्थ आणि उत्पादन व्यवस्था आणि मध्ययुगीन राजकीय संकल्पना यांच्या दूषित व शेवाळलेल्या डबक्यात अडकून पडला आहे; त्या समाजाला उचलून आधुनिक उद्योग व अर्थव्यवस्था, वैज्ञानिक प्रगती, बुद्धिवादी विचारसरणी व उदार लोकशाही प्रणालीवर आधारित राज्यव्यवस्था ही वैशिष्ट्ये असलेल्या इतिहासाच्या मुख्य प्रवाहात आम्ही आणून सोडणार आहोत. पण येथील वास्तव वेगळे आणि हटवादी होते. 'एक व्यक्ती-एक मत' या तत्त्वावर आधारलेली प्रातिनिधिक लोकशाही राज्यपद्धती इथे आणावी असा राज्यकर्त्यांचा इरादा स्पष्ट होताच येथील मनुष्यांचे समुदाय आपल्या विशिष्ट जीवनशैलीवर आघात होत आहे किंवा होणार आहे या धास्तीने हडबडले व काही विशेष अधिकारांचा आग्रह धरू लागले. त्यातील पहिल्या पायरीवरील आग्रह स्वतंत्र मतदार संघांचा होता. १८८३ साली स्थानिक स्वराज्य संस्थांचे उद्घाटन झाले तेव्हा मुसलमानांचा हा आग्रह मान्य करण्यात आला. मोर्ले-मिंटो सुधारणांनी (१९०९ साली) मुसलमानांचे स्वतंत्र मतदार संघ प्रांतिक व केंद्रीय विधिमंडळावरील प्रतिनिधित्वासाठी मान्य केले. मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांमध्ये मुसलमानांचे स्वतंत्र मतदारसंघ कायम राहिलेच पण मुंबई व मद्रास प्रांतात ब्राह्मणेतरांसाठी - ते बहुसंख्य असतानाही - राखीव जागा ठेवण्यात आल्या. १९३२ च्या जातीय निवाड्यात (कम्युनल ॲवार्ड) मुसलमानांचे स्वतंत्र मतदार संघ राखून, शिवाय, मागासवर्गीयांसाठी स्वतंत्र मतदार संघांची तरतूद केली होती. गांधींनी प्राण पणाला लावून मागासवर्गीयांचे स्वतंत्र मतदारसंघ रद्द करवून त्यांच्यासाठी राखीव जागा आणल्या. स्वातंत्र्यानंतरही हिंदुस्थानातील विविध गट 'एक वस्ती-एक मत' या तत्त्वावरील प्रतिनिधित्वाला मान्यता देण्यास तयार नाहीत. मागासवर्गीयांच्या राखीव जागा शाबूत आहेतच पण स्त्रियांसाठी राखीव जागांची मागणी होत आहे.

इंग्रजी राज्यकर्त्यांनी दाखविलेल्या आधुनिकता व प्रगती यांच्या आदर्शांवर विश्वास ठेवून सुशिक्षित हिंदुस्थानवासीयांनी आधुनिकता व प्रगती यांचा स्वीकार करण्याला उत्सुक व लायक असा समाज घडविण्याचे उद्दिष्ट बाळगून निरनिराळ्या संस्थांच्या उभारणीला सुरुवात केली. अपेक्षा अशी होती की, अशा संस्थांतून काम करताना व्यक्ती आपला धर्म, भाषा, जात, व्यवसाय, घराणे इत्यादिकांची कवच-कुंडले उतरवून ठेवतील व निखळ व्यक्ती म्हणून स्वतःच्या ठिकाणी असणाऱ्या गुणांचा व कौशल्यांचा लाभ संपूर्ण समाजाला करून देतील. अशाच उद्देशातून व काही उदारमतवादी इंग्रजांच्या उपदेशातून या सुशिक्षितांनी काँग्रेस ही संस्था, इंग्रज राज्यकर्ते ज्या राजकीय सुधारणा देऊ इच्छित होते त्या स्वीकारण्यासाठी, निर्माण केली.

तथापि, या संस्थेच्या धुरिणांच्या हे लक्षात आले की, मुस्लिम समाजातील लोक आपल्या संस्थेकडे आकृष्ट होत नाहीत. मुंबईला भरलेल्या पहिल्या काँग्रेस अधिवेशनाला (१८८५) बहात्तर प्रतिनिधी आले होते; त्यापैकी फक्त दोन मुसलमान होते. कलकत्त्याला दुसरे

अधिवेशन भरले तेव्हा काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी दोन मुस्लिम संघटनांना, त्यांनी आपले प्रतिनिधी पाठवावेत असे आवर्जून निमंत्रण दिले होते. पण या दोन्ही संघटनांनी या निमंत्रणाला नकार दिला.[३] मुसलमानांचा अनुनय करण्यासाठी काँग्रेसच्या सूत्रचालकांनी तिसऱ्या अधिवेशनासाठी बद्रुद्दिन तय्यबजी या मुसलमान मनुष्याची अध्यक्षपदावर स्थापना केली! हे गृहस्थ पहिल्या दोन अधिवेशनांना साधे प्रतिनिधी म्हणूनही हजर नव्हते. चौथ्या अधिवेशनात काँग्रेसच्या अध्वर्यूंनी मुसलमानांची आर्जवे करण्यातील पुढची पायरी गाठली. त्यांनी असा ठरावच केला की, एखाद्या विषयाची चर्चा करण्याला सर्व हिंदू किंवा सर्व मुस्लिम प्रतिनिधींचा विरोध असेल तर त्या विषयाची चर्चा काँग्रेसच्या अधिवेशनात होणार नाही. अशा रीतीने 'जातीय नकाराधिकारां'ची प्रस्तावना काँग्रेसने करून दिली. काँग्रेसच्या या धोरणाचे प्रा. मोरे मुस्लिमांना आश्वस्त करणे[४] (९४२) असे समर्थन करतात तर ही माहिती देणारे खलिक हे अभ्यासक त्याचे 'मुस्लिमांचा अनुनय (वूइंग)' असे वर्णन करतात. असो.

भारतीय राजकारणात गांधी अग्रस्थानी पोचले ते खिलाफत चळवळीच्या निमित्ताने. असहकाराच्या चळवळीची प्रस्तावना गांधींनी प्रथम खिलाफत समितीच्या व्यासपीठावरून केली. त्याला 'पंजाबातील सरकारी अत्याचारांचा निषेध' व 'स्वराज्य' यांची जोड देऊन त्यांनी ही चळवळ काँग्रेसला स्वीकारायला लावली, हे आपण पाहिले. पण असहकाराची चळवळ संपल्यानंतर मुसलमान पुनः काँग्रेसपासून दूर गेले. १९२५ च्या डिसेंबरात भरलेल्या लीगच्या अधिवेशनात लीगने काँग्रेसने जोपासलेल्या राष्ट्रवादाच्या संकल्पनेला विरोध केला व सांगितले की, हिंदू व इस्लाम हे केवळ दोन धर्म नाहीत, तर ही दोन राष्ट्रेच आहेत. १९२५ च्या डिसेंबरात काँग्रेसचे जे अधिवेशन भरले त्यात जवळपास कोणीही मुस्लिम प्रतिनिधी हजर नव्हता. महमद अल्ली, शौकत अल्ली व मौलाना आझाद एवढे तिघेच हजर होते. मालवीयांनी आपल्या भाषणात या गोष्टीचा उल्लेख करून म्हटले की, मुसलमानांनी काँग्रेसला सोडून दिलेले दिसते आहे.[५]

काँग्रेस व मुस्लिम यांच्यातील संबंधांच्या पुढच्या काही टप्प्यांचा विचार — उदा. नेहरु समितीचा अहवाल, जीनांच्या चौदा मागण्या इ.— आपण लेखांक ३ मध्ये केला आहेच. यानंतर कायदेभंगाची चळवळ झाली, गोलमेज परिषदा झाल्या, 'जातीय निवाडा' आणि ३५ सालच्या सुधारणांचा कायदा आला. 'जातीय निवाडा' (कम्युनल अॅवार्ड) काँग्रेसने फेटाळायला हवा होता. पण काँग्रेसचे त्यावेळचे अध्यक्ष अन्सारी यांच्या सांगण्यावरून व मुसलमानांच्या संशयांना वाव मिळू नये यासाठी काँग्रेसने निवाडा फेटाळला नाही.[६] प्रा. मोरे यांनी केळकरांच्या लोकशाही स्वराज्य पक्षाची बरीच टिंगल केली आहे. (९३०) 'या पक्षाचे अवतारकृत्य संपल्यामुळे तो इतिहासात जमा झाल्यासारखाच होता' असे म्हटले आहे. काँग्रेसने कौन्सिल-प्रवेश स्वीकारल्यानंतर हा पक्ष काँग्रेसमध्ये विलीन झाला पाहिजे होता असेही म्हटले आहे. पण लोकशाही स्वराज्य पक्ष व काँग्रेस यांच्यात, कौन्सिल प्रवेशानंतरही, मतभेदाचा मुद्दा उरला होता तो 'जातीय निवाडा' हाच. किंबहुना सावरकर लोकशाही स्वराज्य पक्षात गेले ते जातीय निवाड्याचा हा पक्ष निषेध करीत होता, यासाठीच. या बाबतीतील प्रा. मोरे यांचे विवेचन 'जातीय निवाडा' हा मुद्दा लक्षात न घेता केलेले असल्याने अनाठायी झाले आहे.

१९३५ च्या सुधारणा कायद्याला अनुसरून १९३७ साली प्रांतिक कौन्सिलांच्या ज्या निवडणुका झाल्या त्यात मुस्लिम लीगचा दारुण पराभव झाला. बिहार, मध्यप्रांत, ओरिसा या हिंदु-बहुसंख्य प्रांतातील मुस्लिमांसाठी राखीव मतदार संघातूनही लीगचा एक देखील उमेदवार विजयी झाला नाही. तीच स्थिती सिंध व वायव्य सरहद्द प्रांत या मुस्लिम बहुसंख्य प्रांतात झाली. पंजाबमध्ये फक्त एक लीग-उमेदवार निवडून आला. सबंध देशात मिळून ४८५ मतदार संघ मुस्लिमांसाठी राखीव होते. त्यापैकी फक्त १०८ जागा लीगला मिळाल्या. या उलट एकूण १५८५ (सर्व प्रांतात मिळून



अनुक्रमणिका

असलेल्या) जागांपैकी काँग्रेसने ७११ जागा जिंकल्या. ब्रिटिश हिंदुस्थानातील एकूण ११ प्रांतांपैकी ६ प्रांतात काँग्रेसला बहुमत मिळाले तर एकाही प्रांतात लीगला बहुमत नव्हते.

या निकालावरून जिनांना कळून चुकले की, मुस्लिमांच्या स्वतंत्र मतदार-संघांच्या मागणीला मध्यवर्ती ठेवून आपण जे जातीय (कम्युनल) राजकारण करीत आहोत त्यातून सत्ता प्राप्त होणे जवळपास अशक्य आहे. राज्यात सत्ता मिळवावयाची तर लीग बहुमतात आली पाहिजे. पण लीगने मुसलमानांच्या सगळ्या जागा जिंकल्या तरी लीगची सत्ता मुस्लिम-बहुल प्रांतात येणे ही अवघड आहे (उदा. बंगालमध्ये २५० जागांपैकी ११७ जागा मुसलमानांसाठी स्वतंत्र मतदार संघ असलेल्या होत्या) मग उत्तर प्रदेशासारख्या हिंदु-बहुल राज्यात, जेथे मुस्लिमांसाठी २२८ पैकी ६६ मतदार संघ राखीव होते, तेथे सत्तेवर येणे अशक्यच आहे. बरे, मुस्लिम बहुल प्रांतातील मुसलमानांना स्थानिक पातळीवरील पक्षांचे आकर्षण – उदा. पंजाबातील सर सिकंदर हयात खान यांची युनियनिस्ट पार्टी – जास्त होते म्हणून जिनांनी लीगला मुसलमानांचा अखिल भारतीय पातळीवर प्रबळ पक्ष बनविण्याचे कार्य हाती घेतले व असा निश्चय केला की, सवलती आणि अल्पसंख्यांकांना संरक्षण या गोष्टी सरकारकडून किंवा काँग्रेसकडून मिळविण्यासाठी लीगचा वापर करावयाचा नाही तर काँग्रेसच्या बरोबरीचा राष्ट्रीय स्तरावरचा मुस्लिम पक्ष अशी प्रतिष्ठा लीगला मिळवून द्यायची.[७]

या मार्गावरील पहिले पाऊल म्हणून लीगने काँग्रेस सत्तेवर आलेल्या प्रांतातून मुसलमानांवर कसा अन्याय होतो आहे त्याचा प्रचार करण्याला सुरुवात केली. लीगने मुसलमानांवरील अन्यायाचे 'पिरपुर रिपोर्ट', 'शरीफ रिपोर्ट', फझलूल हक्क यांनी लिहिलेला 'मुस्लिम सफरिंग्ज अंडर काँग्रेस रूल' हा अहवाल यांच्या पुस्तिका प्रसिद्ध केल्या. ३९ साली काँग्रेसच्या प्रांतिक सरकारांनी राजीनामे दिले तेव्हा लीगने 'मुक्तिदिन' साजरा केला.

दुसरे महायुद्ध सुरू झाले आणि काँग्रेसने सरकारला युद्धाच्या बाबतीत बिनशर्त सहकार्य देण्यास नकार दिला. या उलट जिनांनी सरकारला सहकार्य देण्याचे आश्वासन तर दिलेच; पण अट घातली ती देखील सरकारला हवी होती तीच. अट ही होती की, हिंदुस्थानच्या भविष्यकालीन राजकीय घटनेविषयी कोणतेही निवेदन करण्यापूर्वी सरकारने हिंदू व मुस्लिम या दोन्ही समाजांची निवेदनाला मान्यता मिळविली पाहिजे. सरकारने जिनांना ताबडतोब अशी जाणीव दिली की, "हिंदुस्थानची भावी घटनाच कशाला, कोणत्याही बाबतीत तुम्ही आणि तुमचा पक्ष यांची संमती असल्याखेरीज आम्ही काही करणार नाही."[८] यानंतर जिनांचे, व्हॉइस रॉय लिनलिथगो व सरकारी यंत्रणा यांच्या लेखी, वजन वाढतच गेले. आपल्याला सरकार दरबारी गांधींइतकाच मान मिळू लागला, असे स्वतः जिनांनीच सांगितले आहे.

इतकी तयारी झाल्यावर मार्च १९४० मध्ये लाहोरला लीगचे अधिवेशन भरले. या अधिवेशनाला पूर्वी कधी नव्हते इतक्या मोठ्या संख्येने प्रतिनिधी हजर होते. २३ मार्च १९४० रोजी 'पाकिस्तान' चा ठराव पंजाबचे मुख्यमंत्री (यांना तेव्हा पंतप्रधान म्हणत) सर सिकंदर हयात खान यांनी मांडला. (हे गृहस्थ खाजगीत पाकिस्तानच्या संकल्पनेची टवाळी करत असत.) ठरावातील पाकिस्तानची संकल्पना शक्य तितकी संदिग्ध ठेवली होती. ठरावात म्हटले होते की, "ब्रिटिश हिंदुस्थानच्या वायव्य व ईशान्य भागात व जिथे जिथे मुस्लिम बहुसंख्या असणारे प्रदेश आहेत त्यांचा एक गट बनवून त्यांचा स्वतंत्र देश (इंडिपेंडन्ट स्टेट) बनवावा. या देशातील विभाग हे स्वायत्त व सार्वभौम राहतील. इंग्रज लोक हिंदुस्थानासाठी जी नवी घटना बनवितील तीमध्ये वर सांगितलेली तरतूद नसेल तर ती घटना आम्ही मान्य करणार नाही."[९]

— २ —

मुस्लिम लीगच्या राजकीय विकासातील हे

वळण अतिशय महत्त्वाचे होते. १९०६ साली लीग स्थापन झाली. तेव्हा पासून तिचे धोरण असे होते की, मुस्लिम समाज अल्पसंख्य परंतु स्वतःची पृथक् ओळख (आयडेंटिटी) जपणारा समाज आहे; 'एक व्यक्ती-एक मत' या लोकशाही तत्त्वाच्या अमलाखाली, हिंदू समाज बहुसंख्य असल्यामुळे, मुस्लिम समाजाची पृथक् ओळख हरवून जाईल; म्हणून या समाजाला राजकीय व घटनात्मक संरक्षण मिळाले पाहिजे, असा युक्तिवाद लढवून अधिकाधिक सवलती इंग्रज सरकारकडून मिळवून घ्यायच्या. प्रा. मोरे म्हणतात त्याप्रमाणे काँगेस पक्ष देखील आपली मुळातली 'धर्मनिरपेक्ष' धारणा बाजूला ठेवून मुसलमानांना 'आश्वस्त' करण्याच्या मागे लागला. पण आता लीगची भूमिका पूर्णपणे बदलली व सवलतींनी आपण आश्वस्त होणार नाही; सुदैवाने हिंदी उपखंडात मुस्लिमांची बहुसंख्या असणारे प्रदेश आहेत, तेथे आमचे राज्य आम्ही करू; अशा पवित्र्यावर लीग येऊन ठेपली.

लीगच्या या भूमिकेचा प्रतिवाद काँग्रेसने कसा केला? प्रा. मोरे यांनी (न.वि. तथा काकासाहेब) गाडगीळ यांच्या 'माझे समकालीन' या पुस्तकातील पुढील उतारा (पसंतीपूर्वक) उद्धृत केला आहे. "वास्तविक फाळणीला तारासिंग प्रभृती शीख नेते, श्यामाप्रसाद मुखर्जी प्रभृती हिंदुसभेचे नेते इत्यादिकांनी मान्यता दिली होती; पण गांधीजी जे विरोध करीत होते, ते अपराधी ठरले..." (९४४) यातील 'गांधीजी पाकिस्तानला विरोध करीत होते' हे निरीक्षण किती खरे आहे ते आता पाहू.

लीगने 'पाकिस्तान' चा ठराव केल्यावर 'हरिजन' मधून व्यक्त झालेली गांधींची प्रतिक्रिया अशी होती. "आठ कोटी मुसलमानांना उरलेल्या हिंदुस्थानाच्या इच्छाशक्तीपुढे (विल) नमायला लावू शकेल अशा कोणत्याही अहिंसक उपायाची मला माहिती नाही. हिंदुस्थानच्या उरलेल्या लोकांना जो स्वयंनिर्णयाचा अधिकार आहे तो मुसलमानांनाही आहेच. सध्या आपण एकाच कुटुंबात राहत आहोत. (एकत्र कुटुंबाच्या) कोणाही सदस्याला वेगळे होण्याचा हक्क आहेच."[१०] यात गांधींनी पाकिस्तानला कोणत्या प्रकारे विरोध दर्शविला आहे? यानंतर काही वर्षांनी गांधींना जो उपाय सुचला तो या लेखाच्या सुरुवातीला जे 'अवतरण' दिले आहे, त्यात सांगितला आहे. तो असा की, हिंसक मुस्लिम जमावापुढे लाखो हिंदूंनी अहिंसेच्या भावनेने प्राणार्पण करावे. प्रा. मोरे याला "मुसलमानांना 'आश्वस्त' करण्याचा एक नवा प्रयत्न" असे नाव देतील काय? की, याला मुसलमानांचा केलेला अतिरेकी अनुनय असे म्हणावे?

यानंतर ब्रिटिश मंत्रिमंडळातील एक वरिष्ठ मंत्री स्टॅफोर्ड क्रिप्स याला हिंदुस्थानातील परिस्थितीवर तोडगा काढण्यासाठी हिंदुस्थानात पाठविण्यात आले. हा सर्व बनाव म्हणजे एक धूळफेक होती. क्रिप्सला पाठविण्यामागील एकमेव उद्देश होता, तो अमेरिकन जनता व सरकार यांच्या पुढे असा देखावा उभा करायचा की, आम्ही भारतीय जनतेचे समाधान करण्याचा आटोकाट प्रयत्न करीत आहोत. क्रिप्स २२ मार्च १९४२ रोजी हिंदुस्थानात आला व त्याने २९ मार्च रोजी पत्रकार परिषद घेऊन आपला जाहीरनामा प्रसिद्ध केला. त्यातील महत्त्वाच्या तरतुदी अशा होत्या. (१) युद्ध संपल्यावर हिंदुस्थानाला वसाहतीचा दर्जा (डोमिनियन स्टेटस्) मिळावा या दृष्टीने पावले टाकावी. (२) युद्ध संपताच घटना-समिती तयार केली जाईल. प्रांतिक विधिमंडळात निवडून आलेले सभासद या घटना-समितीवर आपले प्रतिनिधी निवडून देतील. हिंदी संस्थानांचे प्रतिनिधीही घटना-समितीवर असतील. (३) या घटना-समितीने बनविलेली घटना ताबडतोब अंमलात आणण्याची हमी ब्रिटिश सरकार दोन अटींवर देईल. (अ) घटना मान्य किंवा अमान्य करण्याचा अधिकार प्रत्येक प्रांतास व संस्थानास असेल व जो प्रांत किंवा संस्थान घटना अमान्य करील तो स्वतंत्र देश म्हणून मान्य केला जाईल. (आ) ब्रिटिशांकडून हिंदी लोकांना सत्ता प्रदान होण्यापूर्वी सत्तांतरामुळे निर्माण होणाऱ्या प्रश्नांसंबंधी ब्रिटिश सरकार व घटना समिती यांच्यात करार होईल. विशेषतः

वांशिक व धार्मिक संबंधाबाबत पूर्वी दिलेल्या आश्वासनांच्या संबंधात हा करार आवश्यक ठरेल. (४) नवी घटना होईपर्यंत हिंदुस्थानच्या संरक्षणव्यवस्थेचे नियंत्रण ब्रिटिश सरकारकडे राहील. पण हिंद-सरकारमध्ये, राष्ट्रकुलात व यूनोमध्ये हिंदी जनतेतील प्रमुख घटकांच्या प्रतिनिधींचे ताबडतोब व संपूर्ण सहकार्य मिळावे असे आवाहन (ब्रिटिश) सरकार करीत आहे."[११]

इथे हे अगदी उघड आहे की, कलम (२) मधील (अ) ही अट पाकिस्तानला आडपडद्याने मान्यता देणारी होती. परंतु या बाबतीत काँग्रेस कार्यकारिणीने केलेल्या ठरावात पुढील वाक्ये होती. 'कोणत्याही प्रदेशाला (टेरिटोरियल युनिट) त्याच्या इच्छेविरुद्ध भारतीय संघराज्यात राहायला भाग पाडावे असा विचारही आमच्या मनात नाही.'[१२] काँग्रेसने क्रिप्स योजना स्वीकारली नाही, हे खरे; पण त्याचे कारण वेगळेच होते. क्रिप्स योजनेतील चौथ्या कलमाने हिंदी नेत्यांना ताबडतोब महत्त्वाची सत्तास्थाने मिळण्याचा दरवाजा उघडला गेला होता. तिसऱ्या कलमातील 'फाळणी'चा बडगा अजून लांब होता. त्यामुळे नेहरु आणि आझाद यांनी क्रिप्सची भेट घेऊन चौथ्या कलमाबद्दल दोन मुद्द्यांचा खुलासा विचारला : (अ) व्हॉइसरॉयच्या कौन्सिलात सर्व हिंदी सभासद आल्यानंतर व्हॉइसरॉयचे कौन्सिलशी संबंध कसे राहतील? इंग्लंडचा राजा व इंग्लंडचे मंत्रिमंडळ यांच्यातील संबंधाप्रमाणेच ते राहतील ना? (आ) लढाईच्या बाबतीत इंग्रज सेनापतीकडेच सर्वाधिकार राहतील; पण हिंदुस्थानच्या संरक्षणाची जबाबदारी व्हॉइसरॉयच्या कौन्सिलकडेच असली पाहिजे, हे मान्य आहे का?"[१३] या दोन्ही बाबतीत क्रिप्स कोणतेच रोकडे आश्वासन देऊ शकला नाही; कारण इंग्लंडचा पंतप्रधान चर्चिल व भारतमंत्री ॲमेरी हे पक्के साम्राज्यवादी होते आणि मूळ (क्रिप्स) योजनेच्या पलीकडे जाऊन काही खुलासे करण्याची वा आश्वासन देण्याची सवडच त्यांनी क्रिप्सला ठेवली नव्हती. तथापि या क्रिप्स-प्रकरणातून एक गोष्ट स्पष्ट होते की, कोण्या प्रांताला, संस्थानाला अगर प्रदेशाला हिंदुस्थानातून फुटून निघण्याची इच्छा झाली तर काँग्रेसचा त्या फुटून निघण्याला विरोध नव्हता.

६ मे १९४४ या दिवशी गांधींची आगाखान पॅलेस या 'तुरुंगा'तून सुटका झाली. त्या वेळी ते खूपच आजारी होते. आजारातून ते वाचणारच नाहीत अशी चर्चिल, ॲमेरी, वेव्हेल अशा लोकांची अपेक्षा होती. पण गांधी बरे झाले व त्यांनी १३ जुलै १९४४ रोजी जिनांशी वाटाघाटी करण्याची तयारी व्यक्त केली.[१४] खरे तर १९४० पासूनच गांधी जिनांशी वाटाघाटी करण्यास उत्सुक होते. पण जिनांचा आग्रह असा होता की, "मी गांधींशी वाटाघाटी करीन; पण ते हिंदूंचे प्रतिनिधी म्हणून येणार असतील तरच!"[१५] याला गांधी तयार नव्हते. पण आता गांधींनी अशी भूमिका घेतली की, "मी कोणाचाही प्रतिनिधी म्हणून येत नाही. पण माझी आकांक्षा मात्र सर्व हिंदी लोकांचा प्रतिनिधी होण्याची आहे." त्याला जिनांनी उत्तर दिले की, "सर्व हिंदी लोकांचे प्रतिनिधित्व करण्याची तुमची आकांक्षा मला मान्य नाही. तुम्ही फक्त हिंदूंचेच प्रतिनिधित्व करता आणि ही वस्तुस्थिती तुमच्या लक्षात येत नाही तोपर्यंत तुमच्याशी युक्तिवाद करणे अशक्य आहे."[१६]

या वाटाघाटी "राजाजी फॉर्म्युला" पायाभूत धरून होत होत्या. गांधींची इच्छा होती की, जिनांनी फॉर्म्युल्याला मान्यता द्यावी. या फॉर्म्युल्यात तीन कलमे होती. (अ) काँग्रेसने जी स्वातंत्र्याची मागणी केली आहे तिला लीगने पाठिंबा द्यावा व युद्धकाळात जे मध्यावधी सरकार स्थापन होईल (ज्याचे आमिष क्रिप्सने दाखवले होते) त्यात काँग्रेसची सहकारी म्हणून लीगने काम करावे. (आ) युद्ध संपल्यानंतर एका आयोगाकडून हिंदुस्थानच्या वायव्य व ईशान्य भागातील मुसलमानांची बहुसंख्या असलेले जिल्हे निवडण्यात येऊन त्या जिल्ह्यातील लोकांचे सार्वमत घेऊन त्यांतून या जिल्ह्यांनी हिंदुस्थानापासून फुटून निघायचे की नाही, हे ठरवून घ्यावे. जर बहुमताने असे ठरले की, स्वतंत्र व्हावे तर त्या जिल्ह्यांचे मिळून स्वतंत्र राष्ट्र करण्यात यावे. (इ) नव्याने

अनुक्रमणिका





निर्माण झालेल्या राष्ट्रांनी संरक्षण, व्यापार व दळणवळण अशा महत्त्वाच्या मुद्द्यांवर परस्परांशी समजुतीने करार करावेत."[७]

खरे तर जिनांनी राजाजींचा फॉर्म्युला ३० जुलै १९४४ रोजीच फेटाळून लावला होता. त्यांचे म्हणणे होते की, लीगच्या पाकिस्तान-ठरावाला सुरुंग लावण्यासाठी हा फॉर्म्युला तयार केला आहे. आताही जिनांनी हा फॉर्म्युला पुनः झिडकारला. पण त्याला कारण सांगितले की, 'आधी स्वातंत्र्य व नंतर फाळणी' असा क्रम फॉर्म्युल्यात आहे; पण आम्हाला "आधी फाळणी व मग स्वातंत्र्य" हा क्रम हवा आहे. इंग्रजांनीच फाळणी करावी व मग स्वातंत्र्य द्यावे."[८] मतभेदाचे इतरही मुद्दे होते, पण तूर्त त्यांचा विचार नको. यावरून दिसून येईल की, गांधींचा फाळणीला विरोध कधी नव्हताच. फाळणी होणे ही गोष्ट दु:खाची व दुर्दैवाची आहे, ती टाळता आली तर चांगले असे त्यांना वाटत होते, हे खरे; पण त्याबरोबरच फाळणी अपरिहार्य आहे हे त्यांना वैचारिक पातळीवर पटलेले होते.

इतक्यानेही भागले नाही. १९४६ सालच्या मार्चमध्ये इंग्लंडमधील मजूर पक्षाच्या सरकारने 'कॅबिनेट मिशन' हिंदुस्थानाच्या प्रश्नावर तोडगा काढण्यासाठी पाठविले. या मिशनने गांधीजींशी अतिशय आदरपूर्वक वाटाघाटी केल्या."[९] यानंतर या मिशनने जी योजना सादर केली तीत नवीन राजवटीचे तीन स्तर कल्पिले होते, ते असे. सर्वोच्च स्तरावर ब्रिटिशांच्या ताब्यातील भारत व संस्थाने यांचा मिळून एक संघ. या संघाकडे फक्त परराष्ट्रधोरण, संरक्षण व दळणवळण या विभागांचाच कारभार राहील. दुसऱ्या स्तरावर संस्थाने व प्रांत यांचे तीन गट राहतील. पहिल्या गटात हिंदूंची बहुसंख्या असणारे प्रांत; दुसऱ्या गटात वायव्य भागातील बहुसंख्य मुसलमान असणारे प्रांत व तिसऱ्या गटात ईशान्येकडील मुसलमानांची बहुसंख्या असणारे प्रांत. या प्रत्येक गटाला सदस्य असणाऱ्या प्रांतांनी ज्या विषयांसंबंधात अधिकार दिले असतील तेवढ्यापुरत्या विषयांबद्दल कायदे करण्याचा अधिकार राहील. शेवटच्या व सर्वात खालच्या स्तरावर प्रांत आणि संस्थाने राहतील व वरील दोन पायऱ्यांवरील अधिकारी मंडळांना असणारे अधिकार वगळून बाकी सर्व अधिकार प्रांतांकडे राहतील."[१०] या योजनेत पाकिस्तान सूत्र रूपाने होतेच. पण तरी काँग्रेसने या योजनेला मान्यता दिली."[११] याचे कारण असे की, काँग्रेसचे चित्त कॅबिनेट मिशनच्या योजनेत जो 'मध्यावधी सरकार'चा मुद्दा आला होता तिकडे लागले होते. मध्यावधी सरकारात काँग्रेस व लीग यांना सत्ताधारी होता येणार होते. या तात्कालिक फायद्याकडे नजर ठेवून काँग्रेसने कॅबिनेट मिशनची योजना स्वीकारली. मुद्दा हा आहे की, येथेही काँग्रेसने 'पाकिस्तान'ला विरोध केला नाही.

अगदी अखेरच्या मुक्कामावर, म्हणजे नेहरु व पटेल यांनी मौंटबॅटनचा फाळणीचा प्रस्ताव स्वीकारल्यावर, १४ जून १९४७ रोजी दिल्लीला अखिल भारतीय काँग्रेस समितीची सभा भरली असताना गांधींनी सभेला फाळणीच्या ठरावाच्या बाजूने मतदान करण्याचे आवाहन केले व फाळणीचा ठराव २९ विरुद्ध १५ असे मतदान होऊन मंजूर झाला. बहुसंख्य सदस्य तटस्थ राहिले."[१२]

प्रा. मोरे यांनी ही सर्व हकिकत आपल्या ग्रंथातून वगळली आहे. फाळणीला गांधींचा (काँग्रेसचाही) विरोध होता हे सांगायला त्यांनी (काकासाहेब) गाडगीळ यांच्यासारखा पक्षपाती साक्षीदार निवडला. आता गाडगीळांचा प्रा. मोरे यांनी दिलेला उतारा (९४४) मतलबी आहे की, गाडगीळांना तसा 'प्रामाणिक भ्रम' झाला होता हा विचार करण्याजोगा प्रश्न आहे. प्रा. मोऱ्यांच्या बाबतीत बोलायचे तर त्यांचे या घडामोडींविषयीचे सर्व विवेचन हिंदुत्ववादी संघटनांवर टीका करायची इतक्याच हेतूने झाले आहे. (९९८).

गाडगीळांना मी ही 'प्रामाणिक भ्रम' झाल्याची सवलत द्यायला तयार आहे याचे कारण असे की, गांधी, नेहरु, पटेल इ. काँग्रेस नेते चार भिंतींच्या आड झालेल्या चर्चेच्या वेळी पाकिस्तानला (वर सांगितल्याप्रमाणे)






मंजुरी देत होते (आणि ह्या मंजुऱ्या वर्तमान पत्रातून प्रसिद्धही होत होत्या.[23]) तरी सार्वजनिक सभांतून किंवा पत्रकार परिषदांतून मात्र ते फाळणी–विरोधी गर्जना किंवा (गांधींच्या बाबतीत बोलायचे तर) निश्चयी विरोध स्पष्टपणे करीत. १९४५ साली केंद्रीय व प्रांतिक विधिमंडळांच्या निवडणुका झाल्या. त्या विषयी कीर सांगतात, "पाकिस्तान विरोधी गर्जना करून आणि लीगवर कडाडून हल्ले चढवून सरदार पटेलांनी हिंदू मतदारसंघांचा विश्वास संपादन केला." नंतर मुंबईला पटेलांनी एका मुस्लिम सभासदाला धारेवर धरून म्हटले, "मुस्लिम लीग ही राष्ट्रवादी संघटना आहे असे जर तुमचे मत आहे, तर तुम्ही काँग्रेसमध्ये राहिला आहातच कशाला? ज्या क्षणापासून विशुद्ध राष्ट्रवादाचा काँग्रेसने त्याग केला, त्या क्षणापासून हा असला खोडसाळपणा वाढत गेला आहे... ही चूक आता पुन: कधीही घडणार नाही. यापुढे काँग्रेस मुस्लिम लीगचे तोंडही पाहणार नाही..." "काँग्रेसने चालविलेल्या लढ्याला सदैव विरोधच करीत राहिलेल्या मुस्लिम लीगशी केव्हाही कसलीच सोयरीक करण्यात येणार नाही, अशी... पं. नेहरुंनी घनघोषणा केली."[24] खुद्द गांधी 'हिंदुस्थानची फाळणी होण्यापूर्वी माझ्या शरीराचे तुकडे होतील' असे ठामपणे सांगत असत हे प्रसिद्धच आहे. मी असे अजिबात मानत नाही की, गांधी–नेहरु–पटेल इ. नेते लोकांची फसवणूक करीत होते. सभांतून व जाहीर रीतीने व्यक्त केलेल्या भावना याच त्यांच्या प्रामाणिक भावना होत्या असेच मी मानतो. त्याच वेळी हेही मी समजून घेऊ शकतो की, अहिंसक मार्गांनी पाकिस्तानला रोखून धरता येणार नाही याची कटू जाणीव त्यांना वाटाघाटीच्या वेळी दुबळे करून सोडीत असे, हे लक्षात घेऊनच मी बिचाऱ्या काका गाडगीळांना 'प्रामाणिक भ्रमा'ची सवलत देतो आहे.[25]

— ३ —

पाकिस्तानची राजकीय मागणी मुस्लिम लीग आग्रहाने पुढे नेत होती व काँग्रेसचे नेते त्या रेट्यापुढे माघार घेत होते हे आपण पाहिले. या राजकीय आक्रमणाला दुसरी बाजू होती ती मुस्लिम हिंसाचाराची आणि काँग्रेसच्या राजकीय माघारीला दुसरी बाजू होती ती मुसलमानांना गोंजारण्याची. चाळीसच्या दशकातील हा दुसरा भ्रम लक्षात घेतल्याखेरीज महाराष्ट्रातील हिंदुत्ववाद्यांच्या चवताळलेपणाचा संदर्भ लक्षात येणार नाही. प्रा. मोरे यांनी हा संदर्भ चलाखीने टाळला आहे. ते म्हणतात, "स्वातंत्र्य लढा व फाळणी हा आपला मुख्य विषय नाही." (११६४) त्यापूर्वी ते लिहितात "हिंदुत्ववाद्यांनी फाळणीच्या विरोधी आंदोलन उभे केले नाही हा सुद्धा (मुद्दा) नाही. ते सतत काँग्रेस व गांधी यांना विरोध करीत राहिले. अखंड हिंदुस्थानसारखी हिंदु-राज्यासारखी आपणाला न झेपणारी स्वप्ने सामान्य लोकांना दाखवीत राहिले आणि तेही महाराष्ट्र आणि टिळक यांना मध्ये घालून, हा खरा मुद्दा आहे." (१०४९) इथे मला हिंदुत्ववाद्यांनी काय केले व नाही केले यांची चर्चा करायची नाही. हिंदुत्ववाद्यांचे समर्थनही करावयाचे नाही. हिंदुत्ववाद्यांनी गांधी व काँग्रेस यांना विरोध करण्याला काही बळकट कारण होते की नाही, एवढेच पाहायचे आहे.

हिंदु–मुस्लिम दंगे २० सालापासून ४० सालापर्यंत वारंवार व घनघोरपणे चालले होते. त्यांची विस्तृत छाननी आंबेडकरांनी केली आहे.[26] एकट्या मुंबई शहरात १९२९ पासून १९३८ पर्यंतच्या दहा वर्षांत २१० दिवस हिंदू–मुसलमानांच्या दंग्यात खर्ची पडले. या दंग्यात सर्व मिळून ५५० माणसे मारली गेली व ४५०० माणसे घायाळ झाली. आंबेडकर सांगतात की, ही वीस वर्षे (१९२० ते १९४०) यादवी युद्धेच चालू होती. या दंग्यात हिंदूंनी मुसलमानांवर अत्याचार केले व मुसलमानांनी हिंदूंवर अत्याचार केले या दोन्ही गोष्टी खऱ्या असल्या तरी मुसलमानांनी हिंदूंवर केलेल्या अत्याचारांची संख्या जास्त भरेल. १९३२ साली बंगाल विधिमंडळात सांगण्यात आले की, १९२२ ते १९२७ या सहा वर्षांत ५६८ स्त्रियांचे अपहरण बंगाल प्रांतात झाले. त्यापैकी ३९५ स्त्रिया हिंदू होत्या व १५१ मुसलमान



होत्या. आंबेडकरांना कोणी हिंदूंचे पक्षपाती म्हणणार नाही. पण त्यांनी नोंदविलेली ही निरीक्षणे आहेत. त्याहून महत्त्वाचे निरीक्षण आंबेडकरांनी मांडले आहे ते असे की, या प्रत्येक दंगलीच्या वेळी गांधी व काँग्रेस यांनी मुसलमानांचा निषेध किंवा धिक्कार करण्याचे टाळले होते.[२७]

एकोणीसशे चाळीस सालानंतर मुस्लिम लीग प्रत्येक दंग्याकडे पाकिस्तानच्या प्राप्तीसाठीचा एक प्रयत्न म्हणून पाहू लागली. मुस्लिम लीगने "नॅशनल गार्ड" नावाची एक संघटना उभी केली होती. पंजाबमध्ये ही संघटना धुमाकूळ घालीत होती. ४६ साली जीनांनी 'डायरेक्ट ॲक्शन'चा आदेश दिला आणि कलकत्त्यात दंगा होऊन ५००० माणसे मारली गेली. बी. आर. नंदांनी म्हटले आहे की, ४६-४७ सालात झालेल्या दंग्यातील क्रौर्य व त्वेष हे पूर्वीच्या दंग्यातील क्रौर्य व त्वेष यांच्या पेक्षा पूर्णपणे निराळ्या कोटीतील होते! मुस्लिम लीगने पाकिस्तानासाठी जो लढा चालविला होता त्यामुळे मुस्लिमात व त्यांच्या विरोधकात जो त्वेष आणि तिडिक निर्माण झाली होती त्यामध्ये या दंग्याचे बीज होते.[२८] अशा या भयंकर दिवसातही गांधींनी हिंदु-मुस्लिम ऐक्याचा उदात्त ध्यास सोडला नव्हता. हिंदूंनी लाखोंच्या संख्येनी मुस्लिमांपुढे बळी जावे हा, या लेखाच्या सुरुवातीला दिलेला, संदेश याच काळातला आहे. परंतु, कुलकर्णी यांनी म्हटल्याप्रमाणे,[२९] अनेक हिंदूंना हा संदेश म्हणजे मुस्लिम पिसाटांपुढे घातलेले लोटांगण असे वाटल्यास नवल नाही.

प्रा. मोरे यांनी गांधींच्या नोआखलीतील कार्याविषयी काही लिहिले नाही. पण शिरुभाऊ लिमये आणि गांधी-खून-खटल्यातील एक आरोपी विष्णुपंत करकरे यांनी नोआखलीला दिलेल्या भेटीविषयी लिहिले आहे. (१११६-१७) 'गांधी हत्त्येच्या कटात सामील होण्याला ते का प्रवृत्त झाले असावेत याची कारणमीमांसा करताना नोआखलीतील अनुभवाचा समावेश करावा लागतो' असे ते म्हणतात. पण हे भयंकर अनुभव प्रा. मोऱ्यांनी दिलेले नाहीत. ती माहिती येथे देतो. भाऊबीजेच्या निमित्ताने करकऱ्यांनी ३००० रु. गोळा केले. ते व हिंदुसभेचे ६ कार्यकर्ते असे सात जण नोआखलीला गेले. त्यांना मुसलमान गुंडांना पोलिस कसे सामील आहेत याचा विलक्षण अनुभव आला. प्रथम पोलिस खेड्यात जात व गावातील (हिंदूंजवळची) हत्यारे जप्त करीत. नंतर गुंड गावात शिरत व श्रीमंत हिंदूंची घरे लुटून जाळून टाकत. पुरुषांना ठार करीत व स्त्रियांवर अत्याचार करीत. नग्न हिंदू स्त्रियांची गावातून धिंड काढली आहे व त्यांचे अपहरण करणारे गुंड त्यांच्या मागून हिडीस हावभाव करीत चालले आहेत अशी छायाचित्रे त्यांना मिळाली. प्रथम नेलेले पैसे व सामग्री संपल्यावर करकरे परत आले आणि पैसे जमा करून पुनः नोआखलीत गेले. पण त्यांना कळून चुकले होते की, फाटलेल्या आकाशाला अशी ठिगळे लावल्याने काही होणार नाही. हे अत्याचार पुनः होणार नाहीत यासाठी 'ठोशास ठोसा' हीच नीती वापरली पाहिजे. मात्र गांधींनी वर्षानुवर्षे चालविलेल्या अहिंसेच्या जपामुळे हिंदूंचे ओजस नाहीसे झाले होते. इथे हे लक्षात ठेवणे गरजेचे आहे की, गांधींची हत्त्या करावी असा करकऱ्यांचा निश्चय झाला नव्हता. दुसऱ्यांदा परत येताना ते नथुराम गोडसे व आपटे यांना भेटले. करकऱ्यांना आलेले अनुभव त्यांना आले नव्हते तरीही ते दोघे संतापाने धुमसत होते आणि मुसलमानांचा सूड घेण्याच्या अनेक योजना त्यांच्या मनात होत्या.[३०]

या लेखाच्या सुरुवातीला जे दुसरे अवतरण दिले आहे, त्यावरून असे दिसते की, ज्याला प्रा. मोरे 'आश्वस्त करणे' म्हणतात, ते करताना गांधींच्या हातून मुसलमानांची आळवणी चाललेली होती, अशी शंका खुद्द गांधींनाच येऊ लागली होती. याच दिवशी (९-१२-४६) देवभानकर व शिरुभाऊ लिमये गांधींना भेटले. त्यांना गांधी काय म्हणाले ते महत्त्वाचे आहे. "मी माझ्यापुरता अहिंसक तोडगा शोधण्याच्या प्रयत्नात आहे. हा तोडगा जनसंमर्दाला अहिंसक बनवू शकेल का, हे मला सांगता येणार नाही. सध्याच्या उद्रेकात अहिंसक मार्गाचा उपयोग होतो का, हे अजून ठरायचे आहे."[३१]

तथापि गांधींना स्वतःपुरता देखील अहिंसक तोडगा सापडायचा नव्हता. त्यांनी शांतीचा व बंधुभावाचा केवढाही प्रचार चालविला असला तरी नोआखलीतील मुसलमानांनी हिंदूंना तेथून हटवायचेच असा संकल्प करून हिंदूंवर आर्थिक बहिष्कार टाकून जगणे असह्य केले होते. तेव्हा गांधी सांगू लागले की, बहुजन समाज जर तुमचे कायमचे शत्रुत्व घेऊन वागत असेल तर तुम्ही गावे सोडून जा. गावोगावीचे मुसलमान त्यांच्या सभांवर बहिष्कार टाकू लागले. ते ज्या रस्त्याने जाणार त्या रस्त्यांवर घाण टाकू लागले. तथापि गांधींनी मनःशांती सोडली नाही व मुसलमानांविषयी त्यांना वाटणारे प्रेमही आटले नाही.[३२] आशा, प्रेम व कणव यांनी भरलेली दृष्टी घेऊन द्वेष, अत्याचार व भडकलेला सूड यांनी होरपळलेल्या नोआखलीतून हिंडणाऱ्या गांधींचे चित्र मनामध्ये आले की, मला एच्.जी.वेल्स् याच्या 'द कंट्री ऑफ द ब्लाइंड' या कथेची आठवण येते. त्या गोष्टीतील डोळस नायक अचानक एका आंधळ्यांच्या गावात आला. आपल्याला दिसणारे निळे आकाश, हिरवी झाडी, सोनेरी ऊन यांची वर्णने तो करू लागला. लोकांनी त्याला वेडे ठरविले आणि डोळ्यांमुळे हे वेड त्याच्या डोक्यात भरले असे निदान करून त्या आंधळ्या लोकांनी त्याचे डोळे काढण्याचे ठरविले.

— ४ —

फाळणी होऊन गेल्यावर परिस्थिती आणखीच बिकट झाली. निर्वासितांचे लोंढे हिंदुस्थानात येऊ लागले. त्यांच्यावर झालेल्या अत्याचारांच्या कहाण्या ऐकून येथील हिंदूंना साहजिकच असे वाटू लागले की, मुसलमानांना आता हिंदुस्थानात राहण्याचा अधिकारच काय? हिंदुस्थानातील मुसलमान हे हिंदुस्थानाचे नागरिक असल्याने नागरिकत्वाचे सर्व हक्क त्यांना मिळतात व त्यांचे संरक्षण सरकारने केले पाहिजे अशा अर्थाची गांधींची प्रवचने निर्वासितांना व हिंदूंना असह्य होऊ लागली. गांधी या ना त्या उपायाने राजकारणातून निवृत्त झाले पाहिजेत अशी भावना पसरू लागली. फाळणीनंतरही सुऱ्हावर्दी हा बंगालचा कुप्रसिद्ध मुख्यमंत्री कलकत्त्यात गांधींच्या संरक्षणाखाली राहत होता. याचा संताप येऊन ३१ ऑगस्ट १९४७ च्या रात्री एका हिंदू जमावाने गांधींच्या वसतिस्थानावर हल्ला केला. १ सप्टेंबरच्या रात्री पुनः एका हिंदू जमावाने गांधींच्या घरावर हल्ला केला. पोलिस आले व त्यांनी, लाठी हल्ला न करता जमावाला शांत केले. गुंडाच्या लाठीचा एक घाव गांधींना बसणारच होता. पण दोन मुलींनी गांधींना ओढून घेतल्याने ते वाचले. त्याच रात्री गांधींनी उपोषण सुरू केले. ते ४ सप्टेंबरला सोडले.[३३]

कलकत्त्याहून गांधी दिल्लीला आले. पंजाबातून लाखोंच्या संख्येने निर्वासित दिल्लीला येत होते. मुलतान, रावळपिंडी, अगदी अमृतसरला देखील मुस्लिम जमावांनी या निर्वासितांवर हिंस्र हल्ले चढविले होते. एका प्रार्थना सभेत गांधी म्हणाले, "आजच मी ऐकले की, हिंदू व शीख निर्वासितांचा, ५७ मैल लांबीचा जथा हिंदुस्थानात येत आहे. 'हे काय होत आहे' या विचाराने माझे डोकेच गरगरू लागले आहे."[३४] अशाच एका जथ्यातून, पुढे गांधीखुनाच्या खटल्यात शिक्षा झालेला मदनलाल पहावा, हिंदुस्थानात आला. "रात्रंदिवस आम्ही पायपीट करीत होतो. श्रमाने गळून गेलेल्या बायका व मुले रस्त्यात झीट येऊन पडत होते. त्यांना तसेच सोडून आम्ही पुढे जात होतो... फाजिल्का (हिंदुस्थानातील गाव) इथे आम्हाला दुसऱ्या एका जथ्यातील माणसे भेटली. त्यात माझे वडील होते. चार-पाचशे लोक गावाकडून निघाले होते. त्यापैकी फक्त ४०-५० माणसे फाजिल्काला पोचली होती. हल्लेखोरांनी जथ्यातील शंभर मुलींना पळविले होते... आणखी एक जथ्था गावात (फाजिल्का) येत होता. त्यात पाचशे विवस्त्र महिला होत्या. त्यांची स्तने, नाके, कान, गाल कापून काढले होते." लिहवणार नाहीत अशा अत्याचारांच्या हकिकती पहावाच्या जबानीत आहेत.[३५]

ह्या निर्वासितांची अशी अभिनिवेशपूर्ण मागणी होती की, वेळ पडल्यास दिल्लीतील मुसलमानांना त्यांच्या घरातून हाकलून देऊन आम्हाला तिथे राहायला



अनुक्रमणिका

द्या. काही निर्वासितांनी तर कायदा आपल्या हातात घेऊन जागा मिळवल्यासुद्धा. याला तोंड देण्याची तयारी दिल्लीतील मुसलमानांनी केली होतीच. मुस्लिम लीगने चालविलेल्या बेलगाम आक्रस्ताळी प्रचाराने त्यांची डोकी आधीच भडकलेली होती. त्यांनी घराघरातून दारुगोळा व शस्त्रास्त्रे जमवून ठेवली होती. दिल्लीतील बहुसंख्य पोलिस मुसलमान होते. परिस्थिति तंग होती. दंगे होत होते व लष्कराला देखील ते आवरत नव्हते.[३६] या लेखाच्या सुरुवातीला मी सांगितल्याप्रमाणे काळाचा पट्टा भयंकर वेगाने गरगरत होता व सर्वांनाच भोवळ आल्यासारखे झाले.

खरे तर काळाच्या पट्ट्याला ही अतर्क्य गती देण्याचे कार्य मौंटबॅटन इथे आल्यापासूनच सुरू झाले होते. इथल्या राज्याची जबाबदारी आपण केव्हा एकदा झटकून टाकून परत जातो, असे इंग्रजांना वाटत होते. त्यामुळे, फाळणी, पंजाब व बंगाल यांच्या फाळण्या, सिल्हेट व वायव्य सरहद्द प्रांतातील सार्वमते, सैन्य, पैसा, शस्त्रे यांच्या वाटण्या इत्यादी हजारो लहान-मोठी कामे मौंटबॅटनने आपल्या तोटक्या संख्येने हाताशी असणाऱ्या अधिकाऱ्यांकरवी (जवळ जवळ १० वर्षात नवीन आय्.सी.एस्. अधिकाऱ्यांची भरती झाली नव्हती.) तडाखेबंद पद्धतीने उरकली व जून १९४८ पर्यंत हाती सत्ता राखण्याची सवड असताना १४-१५ ऑगस्ट ४७ लाच पाकिस्तान-हिंदुस्थान यांना जन्माला घालून तो मोकळा झाला. या झपाट्यात सीमावर्ती भागातून हाहाकार माजेल हे इंग्रजांच्या ध्यानात आले नव्हते असे नाही. मौंटबॅटनने गांधींना आश्वासन दिले होते की, "दंगे व रक्तपात होणार नाही याची जबाबदारी माझी"[३७] प्रत्यक्षात काय झाले? पंजाबातील नरसंहाराचे विक्राळ रूप पाहून हताश झालेले नेहरु आणि जिनासुद्धा मौंटबॅटनला म्हणाले की, "लाहोर व अमृतसर इथे लष्करी कायदा पुकारा. ब्रिटिश फौजांना निर्दयपणे गोळीबार करून शांतता प्रस्थापित करायचा हुकूम द्या." पण पंजाबचा गव्हर्नर जेन्किन्स म्हणाला की, "लष्करी कायदा पुकारणे अशक्य आहे. आपल्यापाशी पुरेसे ब्रिटिश सैनिकच नाहीत. बरे, जातीयवादी दंगेखोरांच्या जमावापुढे ब्रिटिश सैनिक(ही) हरले तर केवढा अनर्थ माजेल?"[३८] यावरून हे कळून येईल की, इंग्रज देखील पार गडबडून गेले होते.

— ५ —

बुद्धीला हादरवून सोडणाऱ्या व स्वच्छ विचाराला चहू अंगांनी झाकोळून टाकणाऱ्या या प्रलयंकारी स्थितीवर तोडगा म्हणून १३ जानेवारी १९४८ रोजी गांधींनी आपले (अखेरचे) प्रायोपवेशन सुरू केले. दिल्लीत शांतता स्थापन व्हावी ही उपोषण सोडण्यासाठीची एक अट होती. पण पाकिस्तानला द्यावयाचे ५५ कोटी रुपये ताबडतोब परत करावेत ही एक 'उपटसुंभ' अट गांधींनी मौंटबॅटनच्या प्रोत्साहना-वरून घातली होती.[३९] हिंदुस्थान हे पैसे देणे लागता होता, हे खरे; पण ते ताबडतोब द्यायला हवे होते असे नाही. 'काश्मीरचा प्रश्न, निर्वासितांची समस्या वगैरे बाबतच्या वाटाघाटी पुऱ्या होऊन हे प्रश्न सोडविण्याबाबत एकमत झाल्याशिवाय याबद्दलची घोषणा करू नये असे ठरले होते.'[४०]

गांधींच्या उपोषणामुळे, दर खेपेस माजत असे त्याप्रमाणेच, खळबळ माजली. लोकांचे जमाव बिर्ला हाऊस पाशी गोळा होऊ लागले. पण या खेपेला येणाऱ्या झुंडीत "गांधी को? मरने दो! हम को? मकान दो!" अशा घोषणा देणाऱ्या निर्वासितांच्याही झुंडी असत. गांधींना भेटायला येणाऱ्या मंत्र्यांची मोटार दिसली की, या ओरड्याला जोर चढे. "मरता है, तो मरने दो!" आणि "खून का बदला खून से लेंगे!" अशा नव्या गर्जनांची त्यात भर पडे. एकदा नेहरुंच्या कानावर या घोषणा गेल्या, तेव्हा मोटर थांबवून ते संतापाने म्हणाले, "कुणाची छाती आहे, अशी घोषणा देण्याची? या माझ्या पुढे. पहिल्यांदा मला मारा."[४१]

अखेर १७ जानेवारीला मंत्रिमंडळाने पाकिस्तानला ५५ कोटी रुपये देण्याचे मान्य केले. एक सर्व पक्षीय बैठक होऊन दिल्लीत शांतता प्रस्थापित

करण्याचा ठराव झाला. मशिदीत उतरलेल्या निर्वासितांना इतरत्र आसरा देऊन मशिदी मुसलमानांच्या हवाली करण्याचे आश्वासन देण्यात आले आणि उपोषण संपले.

गांधींनी उपोषणाला सुरुवात केल्याची व त्यांच्या १४ मागण्यांची बातमी टेलीप्रिंटवर गोडसे व आपटे यांनी वाचली व दोघांनी अचानक पण एकदमच संकल्प सोडला, "गांधींना मारलेच पाहिजे."[४२] माळगावकरांनी दीर्घकाळ शोध घेऊन, पुरावे तपासून, कपूर आयोगाचा अहवाल अभ्यासून आपले पुस्तक लिहिले आहे व ते निश्चयाने सांगतात की, गांधींचा खून करण्याचा निर्णय या दोघांनी १३ जानेवारी १९४८ रोजी घेतला. उलट प्रा. मोरे सांगतात की, "गांधी हेच फाळणीला जबाबदार आहेत, अशी हिंदुत्वनिष्ठांची समजूत झाली व त्यांनी गांधींना संपवले. तथापि ही गोष्ट आता घडून गेलेली. त्यांचे हे कृत्य प्रतिबंध स्वरूपाचे न बनता ती त्यांनी त्यांच्या न्यायनिवाड्याप्रमाणे गांधींना दिलेली शिक्षा ठरते व इतिहासाच्या प्रक्रियेतील हस्तक्षेप म्हणून त्याचे मूल्य कमी होते. अर्थात् याची जाणीव असल्यामुळेच की काय, पंचावन्न कोटी रुपयांच्या प्रकरणाचा आणि संभाव्य अनर्थांचा उल्लेख करण्यात आला." हे सर्व लिखाण अतिशय पूर्वग्रहदूषित आहे.

हिंदुत्वनिष्ठांची खरोखरच अशी इच्छा असती की गांधींचा खून करावा, तर त्यांनी फाळणीपूर्वीच गांधींना मारण्याची खटपट केली नसती काय? गांधींची हत्या करणे हे गांधींना मारण्याचा ज्याने निश्चय केला आहे त्याच्यासाठी किती सोपी गोष्ट होती हे गोडस्याने ज्या सहजपणे गांधींचा खून केला, त्यावरून कळून येते. नोआखलीत गांधींचा खून करून हा खून नोआखलीतल्या अत्याचारी मुसलमानांनी केला, असा देखावा करणेही शक्य होते. यावरून हे स्वच्छ आहे की, फाळणीच्या काळात, गांधींचा खून करावा किंवा गांधींना संपवून आपण फाळणी टाळू शकतो असा विचारही हिंदुत्ववाद्यांच्या मनात आला नसला पाहिजे. केवळ मतांच्या राजकारणाच्या दृष्टीने पाहिले तरी गांधींना जिवंत ठेवून त्यांच्या आदर्शवादापुढे नमणाऱ्या काँग्रेसला बदनाम करणे हे जास्त फायद्याचे होते व एवढे ओळखण्याइतका चाणाक्षपणा हिंदुत्ववाद्यांकडे नक्कीच असला पाहिजे.

दुसरे असे की, गांधींचा खून करायचे ठरवलेच असते तर त्यासाठी गोडसे-आपटे यांची निवड कोणीच केली नसती. दोघांना घातक शस्त्रांचे काहीच ज्ञान नव्हते. पिस्तुले, बंदुका, हातबॉम्ब हे त्यांनी कधीच पाहिले नव्हते. मग ती शस्त्रे वापरण्याचा सराव दूरच. गांधींच्या खुनाचा व्यूह रचण्याच्या कामी ते किती निरुपयोगी होते हे २० जानेवारी १९४८ ला गांधींचा खून करण्याच्या बनावाचा जो फजिता झाला त्यावरून स्पष्टच झाले होते. गांधींच्या खुनामागे हिंदुसभेच्या वरिष्ठ पुढाऱ्यांचा काही हात असता तर २० जानेवारीनंतर त्यांनी गोडसे-आपटे इत्यादींना चांगली समज देऊन स्वस्थ बसवले असते. अधिक चांगली शस्त्रे मिळवून व निष्णात नेमबाजांना बोलावून त्यांनी जास्त काळजीपूर्वक आखणी केली असती. माळगावकरांच्या पुस्तकावरून असे दिसते की २० जानेवारीची फसगत झाल्यानंतर गोडसेने एकट्याच्या जबाबदारीवर व खुनानंतर पोलिसांच्या स्वाधीन होण्याचा निश्चय करून ग्वाल्हेरच्या परचुऱ्यांकरवी पिस्तुल विकत घेतले व गांधींचा खून केला.

सावरकरांना या कटात मुद्दाम गोवण्यात आले हे देखील माळगावकरांनी खात्री पटावी इतक्या स्वच्छतेने स्पष्ट केले आहे. पुस्तकाच्या नव्या २००७ च्या आवृत्तीत तर त्यानी आंबेडकरांचा हवाला देऊन सावरकरांना अटक करण्यामागे काय हालचाली होत्या, हे सांगितले आहे. झालेल्या खटल्यात सावरकरांना तात्काळ निर्दोष ठरविण्यात आले, हे सर्वांना माहीतच आहे. तरीही प्रभाकर पाध्ये, नरहर कुरुंदकर अशा 'पुरोगामी विचारवंतां'नी सावकरांविषयी संशय वाटत राहावा अशी संदिग्ध विधाने केली आहेत.

खरी गोष्ट दिसते ती अशी की, ज्याने 'विपरीतार्थदर्शन' हे महाशस्त्र हाती धरले होते अशा त्या






काळात, मुळातच भडक डोक्याचे असणाऱ्या गोडसे व आपटे यांनी निर्वासितांवर झालेल्या अत्याचारांच्या कहाण्या ऐकून स्वतःला निर्वासितांशी एकरूप करून घेतले, 'वस्तुतः महाराष्ट्राचा व पंजाब-दिल्लीच्या कत्तलीचा बादरायण संबंध लागणेही कठीण' (१०२४) असे न.र. फाटकांचे एक विधान प्रा. मोरे यांनी उद्धृत केले आहे. फाटकांसारख्या कोरड्या मनुष्याला ही गोष्ट कठीण वाटली तरी भावनाशील, कुढ्या आणि लखोटबंद मनाच्या गोडसेने निर्वासितांवरील आपत्तीशी एकरूपता साधून मनाला पिसाळवून सोडले असणे शक्य आहे. मनात दाटत आलेला गांधींवरचा संताप ५५ कोटींच्या प्रश्नावरून पराकोटीला पोचला व त्या सणकेच्या भरात गोडसेने गांधींच्या खुनाचे निंद्य कृत्य केले असा निष्कर्ष चुकीचा ठरणार नाही.

आम्ही लहानपणी तरी असेच ऐकत होतो की, एका माथेफिरूने गांधींचा खून केला; व महाराष्ट्राबाहेर आणि जगातही हीच समजूत आहे. अनेक वर्षांपूर्वी मी स्वीडनला गेलो असताना एका म्हाताऱ्या माणसाने मला विचारले "गांधींचा खून एका माथेफिरूने केला असे आम्ही ऐकत असतो. हा होता तरी कोण?" त्याने माझ्याकडून गोडसेचे संपूर्ण नाव लिहून घेतले. तथापि, महाराष्ट्रात मात्र न.वि. गाडगीळ, ना.ग. गोरे, प्रभाकर पाध्ये, कुरूंदकर अशा राजकारण्यांनी व विचारवंतांनी आणि त्यांच्या अनुयायांनी "केळकरांच्या काळापासून गांधींच्या राजकारणाला विरोध करणाऱ्या ब्राह्मणांनी जी वृत्ती जोपासली त्याची परिणती गांधींच्या हत्येत झाली," असा विचार राजकीय फायद्यासाठी म्हणा किंवा 'प्रामाणिक भ्रम' झाल्याने म्हणा सतत धगधगत ठेवला आहे.

गोडसेने गांधींचा खून केला हे भयंकर घातकी, क्रूर व गर्ह्य कृत्य झाले यात शंकाच नाही. गांधी हे हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्ययुद्धातील 'अर्थाचा कधीच दास न झालेले' भीष्म होते. भीष्म पडले त्याचे वर्णन करताना महाभारताने म्हटले आहे :

हा हेति तुमुलः शब्दः भूतानां समपद्यत।
सीमावृक्षे निपतिते कुरूणां समितिक्षत्रे।।

याच ठिकाणी या लेखमालेचा शेवट करावा हे उचित. उरलेले जे चिंतनीय मुद्दे आहेत त्यांच्यासाठी स्वतंत्र लेख सवडीने लिहू.

❋ ❋ ❋

**तळटीपा :**

१) "Mahatma" D.G. Tendulkar, Vol 7, P. 260-61
२) "My Days with Gandhi", Nirmal Kumar Bose. P. 102 ही श्री. बोस यांच्या दैनंदिनीतील नोंद आहे. गांधींनी हे उद्गार काढले आहेत.
३) S.Settar & Indira Baplista Gupta (Ed.) Pangs of Partition, Delhi (2002) या पुस्तकातील Khwaja A. Khalique यांचा Genesis of Partition हा लेख, पान ११८.
४) कंसातील आकडे 'लोकमान्य ते महात्मा' या पुस्तकातील पानांचे.
५) खालिक, उपरोक्त, पान १२४
६) V.B.Kulkarni. The Indian Triumvirate Bharatiya Vidya Bhavan, Bombay (1961) P.106. आणखी पाहा. आंबेडकर पाकिस्तान. पान २४
७) 'पँग्ज ऑफ पार्टिशन', उपरोक्त, या पुस्तकातील सलील मिश्रा यांचा 'एक्स्प्लेनिंग पार्टिशन' हा लेख.
८) 'दी इंडियन ट्रायमव्हायरेट', उपरोक्त. पान १६२
९) स्टॅन्ली वोल्पर्ट : द शेमफुल फ्लाईट प्रकरण १ ले. माझ्या टिपणात पानांचे आकडे लिहावयाचे राहून गेले आहेत.
१०) 'पँग्ज ऑफ पार्टिशन' उपरोक्त मधील बी. आर. नंदा यांचा 'ट्रॅजेडी ॲण्ड ट्रायम्फ : लास्ट डेज ऑफ महात्मा गांधी' हा लेख. पान ४४

११) गोविंद तळवळकर : 'सत्तांतर' खंड १ पान २३२ – ३३ वरून संक्षेपाने.
१२) पँग्ज ऑफ पार्टिशन. उपरोक्त. पान ४४
१३) व्ही. बी. कुलकर्णी. उपरोक्त. पान १७१–७२
१४) उपरोक्त पान १८४
१५) ब्राऊन, ज्युडिथ. "गांधी–प्रिझनर ऑफ होप." पान ३४९
१६) उपरोक्त पान ३५२. हा उतारा गांधी–जिना पत्रव्यवहारातील असून हे पत्र जिनांनी १७ सप्टेंबरला लिहिले आहे. गांधी–जीना बोलणी ९ सप्टेंबरला सुरू झाली व १८ दिवस चालली.
१७) उपरोक्त पान ३५१.
१८) उपरोक्त पान ३५२.
१९) उपरोक्त पान ३६७.
२०) उपरोक्त पान ३६६.
२१) पँग्ज ऑफ पार्टिशन, उपरोक्त पान ४४
२२) एम्. तय्येबुल्ला. बिटवीन सिंबल अॅण्ड आयडॉल अॅट लास्ट. (नवी दिल्ली १९६४) पान १९६. तय्येबुल्ला यांनी विरूद्ध मत दिले.
२३) कीर धनंजय : स्वातंत्र्य वीर सावरकर (अनु. द.पां. खांबेटे) पान ३६९. इथे टाईम्स ऑफ इंडियाने गांधींनी पाकिस्तानचे तत्त्व मान्य केले म्हणून त्यांचा उदोउदो केल्याचा उल्लेख आहे.
२४) कीर. उपरोक्त. पान ३८३.
२५) या संबंधात गोविंद तळवळकर यांनी 'सत्तांतर १९४७ खंड २' (१९९७) या पुस्तकात पान २७७ वर म्हटले आहे, "फाळणी अटळ आहे असे दिसत असले तरी तिची अपरिहार्यता स्वीकारण्याची गांधींची व काँग्रेस नेत्यांची मानसिक तयारी नव्हती आणि फाळणीविरुद्ध ठाम भूमिका घेऊन तिच्या परिणामांसाठी तयार राहण्यास ते राजी नव्हते. मुसलमानांना स्वयं-निर्णयाचा हक्क आहे असे मानायचे; हिंदूंना सशस्त्र संघर्ष करूनच पाकिस्तान टाळता येईल, पण अशा संघर्षाचे आपण साक्षीदार होणार नाही, असे गांधीजींनी म्हणायचे, आणि त्यानंतरही माझ्या देहाचे तुकडे होतील, पण देशाची फाळणी होणार नाही अशी ग्वाही द्यायची, याने फक्त मानसिक गोंधळाचे प्रदर्शन झाले." (पान २७७)
२६) आंबेडकर. पाकिस्तान ऑर पार्टिशन ऑफ इंडिया (१९४५) पाने १५२ – १७७
२७) आंबेडकर. उपरोल्लेखित. पान १४८–४९.
२८) पँग्ज ऑफ पार्टिशन. पान ४३.
२९) इंडियन ट्रायमव्हायरेट. पान १९६
३०) मनोहर माळगावकर : द मेन हू किल्ड गांधी. (१९७८) पाने ४४–४५–४६
३१) निर्मल कुमार बोस, उपरोक्त. पान १०४
३२) उपरोक्त. पाने १४८–४९–५०–५१.
३३) उपरोक्त. पान ७६–७७.
३४) व्ही. बी. कुलकर्णी उपरोक्त. पान २१२
३५) माळगावकर. उपरोक्त. पान ११
३६) कुलकर्णी. उपरोक्त. पाने २१२–१६.
३७) माळगावकर. उपरोक्त. पान १.
३८) वोल्पर्ट. उपरोक्त. प्रकरण ८ वे.
३९) माळगावकर. उपरोल्लेखित. पान १४.
४०) य.दि. फडके. विसाव्या शतकातील महाराष्ट्र, खंड सहावा. पान ५६.
४१) उपरोल्लेखित ९१–९२
४२) माळगावकर, उपरोल्लेखित. पान १९.

❋ ❋ ❋



# मनुष्य बुद्धिवादीच आहे काय ?

## प्रा० कमलाकर दीक्षित

(१)

मनुष्य हा इतर प्राण्यांपेक्षा श्रेष्ठ आहे हे सिद्ध करण्याची मनुष्याची धडपड प्राचीन काळापासूनची आहे. आरंभी मनुष्य हा दोन पायांचा प्राणी आहे, अशी व्याख्या करण्यात आली. पण त्यांत पक्ष्यांचाही समावेश होतो असे दिसून आले. मग मनुष्य हा हसणारा प्राणी आहे, अशी व्याख्या पुढे आली. कालांतराने तरस हा प्राणी हुबेहूब माणसारखा हसतो (म्हणजे ओरडताना तरसाचा आवाज माणसाच्या हसण्यासारखा येतो) हे समजून आले. त्यामुळे ती व्याख्याही मागे पडली. ॲरिस्टॉटलने 'मनुष्य हा राजकारणी प्राणी आहे' अशी व्याख्या सुचविली. अन्य कोणताही प्राणी राजकारण करीत नाही हे लक्षात घेता ही व्याख्या सत्याच्या जवळ जाणारी होती; पण, 'राजकारणी' हे विशेषण फारसे आदरयुक्त आहे, असे राजकारण्यांसह कोणालाही वाटत नसावे. म्हणून मग ॲरिस्टॉटलच्या व्याख्येकडे दुर्लक्ष करण्यात आले असावे.

इतर प्राण्यांच्या मानाने मनुष्य हा बुद्धिमान असतो. यामुळे 'मनुष्य हा बुद्धिमान प्राणी आहे' ही व्याख्या लोकप्रिय ठरली. तरीसुद्धा इतर प्राण्यांना कमी प्रमाणात असली तरी बुद्धी असते हे समजून आल्यामुळे पुढे शोध चालू राहिला.

पुढे मध्ययुग संपून आधुनिक युग सुरू झाले. प्रबोधन काळात विद्या, कला, शास्त्रांचे पुनरुज्जीवन होऊ लागले. भौतिकशास्त्रासह इतर अनेक शास्त्रांत संशोधन झाले. संशोधनातून शोध लागले. भौगोलिक पर्यटन होऊन नवनवीन प्रदेश उजेडात आले. आधुनिक युगातील गेल्या ३०० वर्षांतील शोध, ॲरिस्टॉटलचे निगमन (डिडक्शन) आणि फ्रॅन्सिस बेकनचे विगमन (इंडक्शन) या दोन तर्कशास्त्रांच्या आधारे लागले. निरीक्षण, उपपत्ती, पडताळा आणि सिद्धांतन या चार पायऱ्यांवर आधारलेली वैज्ञानिक विचारपद्धती प्रचारात आली. ही तार्किक विचारपद्धती युक्लिड या ग्रीक शास्त्रज्ञाच्या भूमिती सिद्धांतांची परिणती होती.

या तार्किक विचारपद्धतीचा विशेष असा होता की, ती मनुष्याशिवाय इतर कोणत्याही प्राण्याला अवगत आणि साध्य नव्हती. त्यामुळे 'मॅन इज ए रॅशनल ॲनिमल' ही व्याख्या केली गेली. ती मात्र सुमारे तीनशे वर्षे तरी प्रचलित आहे. कार्यकारणभाव हा या विचारपद्धतीचा पाया आहे.

'रॅशनल' या शब्दाला मराठीत तर्कनिष्ठ, विवेकनिष्ठ, आणि बुद्धिवादी असे प्रतिशब्द सुचविले जातात. पैकी 'बुद्धिवादी' हा शब्द त्यातल्या त्यात अधिक अर्थवाही आहे. अर्थात बुद्धिवादी दृष्टिकोणासाठी सर्वसामान्य बुद्धिमत्ता पुरेशी होते. त्यामुळे जो अधिक बुद्धिमान आहे तो अधिक बुद्धिवादी आणि जो कमी बुद्धिमान तो कमी बुद्धिवादी असे मात्र होत नाही. जगातील सर्व धर्मसंस्थापक अत्यंत बुद्धिमान होते; परंतु बुद्धिवादी नव्हते. असो.

या बुद्धिवादी दृष्टिकोणामुळे जगातील भौतिक संपत्ती वाढली. जीवनात सोयी सुविधा आल्या. औद्योगिक क्रांती झाली. वैद्यकीय क्षेत्रांतील शोधांमुळे लोकांचे आरोग्य सुधारले. आयुष्यमान वाढले. विविध यंत्रांमुळे कष्ट कमी झाले. प्रवास जलद आणि सुखकर होऊ शकला. या दृष्टिकोणामुळेच जगात स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव या मूल्यांचा उद्भव झाला. लोकशाहीला आणि समाजवादाला महत्त्व प्राप्त झाले.

(२)

मात्र पुढे अशा काही घटना घडल्या की,








बुद्धिवादाबद्दल प्रथम सर्वसामान्य माणसाला आणि नंतर विचारवंतांनाही शंका येऊ लागली. पहिल्या महायुद्धापासून या शंकेला सुरुवात झाली. पुढे हिटलर, मुसोलिनी, स्टॅलिन, हिरोशिमा, नागासाकी इत्यादी व्यक्ती व घटनांमुळे जगात बुद्धिवादाची आणि वैज्ञानिक प्रगतीची प्रतिष्ठा कमी झाली.

बुद्धिवाद आणि मूल्यविवेक या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत असे जग धरूनच चालले होते. मराठीत तर बुद्धिवादाला 'विवेकनिष्ठा' असा मूल्यवाचक पर्यायी शब्द प्रचारात आहे. बुद्धिवादातूनच युरोपात उदारमतवाद जन्माला आला होता. या उदारमतवादामुळे पुष्कळ लोककल्याण साधले. त्यामुळे बुद्धिवाद आणि मूल्यविवेक यांत काही फरक नाही अशी समजूत होऊन बसावी यात नवल नाही.

वस्तुतः बुद्धिवाद हा नीतिनिरपेक्ष असतो. हिटलर, स्टॅलिन, इदी अमीन, सद्दाम हुसेन इत्यादिकांनी मानवी छळाचे जे मार्ग अवलंबिले होते ते विज्ञानावर आधारलेले होते. प्रत्येक हुकूमशहा उपलब्ध शस्त्रास्त्रांचा वापर करीत असतो. आईन्स्टाइनने 'इ = एमसी²' हे समीकरण सिद्ध केले. त्यातून अणुऊर्जा आणि अणुबॉंब हे दोन्ही बनविता येतात.

या बरोबरच आणखी एक चूक माणसाने केली. 'मनुष्य हा बुद्धिवादी प्राणी आहे' ही व्याख्या माणसाला भूषणावह वाटू लागली. त्याचा आत्मसन्मान वाढला. इतर प्राण्यांकडे तो जनावरे म्हणून पाहू लागला. जनावर ही माणसाच्या लेखी शिवी झाली (यू ब्रूट !). या आनंदात आपणही एक प्राणी आहोत हे माणूस विसरला. वस्तुतः 'बुद्धिवादी' हे विशेषण असून 'प्राणी' हे विशेष्य आहे. हत्ती हा शाकाहारी प्राणी आहे, या वाक्यासारखेच ते वाक्य आहे; जॉर्ज वेन हा जगातील सर्वांत उंच माणूस आहे; हे दुसरे उदाहरण. हत्ती शाकाहारी असला तरी तो एक प्राणी आहे, जॉर्ज वेन हा सर्वात उंच असला तरी माणूस आहे आणि बुद्धिवादी असला तरी मनुष्य हा एक प्राणी आहे हे विसरणे म्हणजे घोडचूक म्हटले पाहिजे.

प्राणी हे मोठ्या व्यासाचे वर्तुळ असून माणूस हे त्याच्या पोटातील छोट्या व्यासाचे वर्तुळ आहे. त्यामुळे माणूस आणि प्राणी यांच्यांत प्रकारभेद नसून अंशभेद आहे. साहजिकच प्राणी आणि माणूस यांच्यांत सहजप्रेरणा त्याच असतात. या व्यतिरिक्त काही वेगळे गुणधर्म प्राण्यांच्या अंगी असतात. माणसाचेही काही वेगळे गुणधर्म असतात. उदाहरणार्थ, कुत्र्याचे घ्राणेंद्रिय माणसापेक्षा संवेदनक्षम असते; सापाला कर्णेंद्रिय नसते; तर जिराफाला स्वरयंत्र नसते. माणसाला पाचही ज्ञानेंद्रिये असून त्याचा मेंदू बराच मोठा असतो. त्यामुळे त्याला बुद्धिमत्ता अर्थातच जास्त असते.

(३)

हा फरक पाहिल्यानंतर आता आपण माणसासकट सर्वच प्राण्यांना सहजप्रेरणा कोणत्या असतात ते पाहू. भूक, झोप, भीती आणि मैथुन या चार सहजप्रेरणा प्रमुख आहेत.

अन्नाशिवाय माणूस किंवा कोणताही प्राणी फार काळ जगू शकत नाही. अन्नामुळेच शरीर बनते आणि पुष्ट होते. अन्नाविना ते झिजून झिजून नष्ट होते. सावरकर आणि विनोबा यांनी प्रायोपवेशन करून आयुष्य संपविले होते. डायनासोर हे महाकाय प्राणी अन्नाभावी नष्ट झाले. दुष्काळात मृत्यू पावलेल्या लोकांची संख्या लाखांत असते. भुकेलेला माणूस अन्नासाठी चोरीसुद्धा करतो. विश्वामित्राने भूक भागविण्यासाठी कुत्र्याची तंगडी खाल्लेली होती, ही कथा प्रसिद्ध आहे. उपाशी माणसासमोर ईश्वरालाही भाकरीच्या रूपात प्रकट व्हावे लागेल असे गांधीजी म्हणत. उपाशी माणूस 'बुद्धिवादी' विचार करू शकत नाही.

अन्नाची भूक भागल्यानंतर प्राण्यांना झोपेची गरज असते. शरीरपुष्टी झोपेतच चांगल्या प्रकारे होते. झोप मिळाली नाही तर प्राणी बेचैन होतो. रात्रपाळी नको असे प्रत्येकजण म्हणत असतो. निद्रानाश हा विकार गंभीर समजला जातो. औषधे घेऊन लोक झोपतात. झोप न मिळालेल्या ड्रायव्हरचे गाडीवर पुरेसे नियंत्रण






राहत नाही. निद्रानाश हा विकार झालेली माणसे चिडखोर बनतात. त्यांचा मेंदू पुरेशा क्षमतेने काम करू शकत नाही. साहजिक तो तार्किक विचार करू शकत नाही.

वस्तुतः भीती ही सहजप्रेरणा सर्वात महत्त्वाची मानली पाहीजे. सर्वच प्राणांच्या सर्वच क्रिया जाणता अजाणता कोठल्या तरी भीतीच्या छायेतच होत असतात. सर्वात मोठी भीती ही मृत्यूची असते. विशेषतः मृत्यूनंतर काय, या प्रश्नाचे उत्तर मिळत नसल्यामुळे मृत्यूच्या भीतीत अज्ञाताची भीतीही सामावलेली असते. प्राणीमात्रांना मृत्यूची भीती नसती तर कोणालाही कशाचीच भीती वाटली नसती. धर्माचा उदय झाला नसता. युद्धेही कदाचित झाली नसती. नागाची, वाघाची, आगीची, प्रलयाची भीती वाटली नसती. असहाय महिलेवर अत्याचार होत असताना कोणी बघ्याची भूमिका घेतली नसती. भीतीमुळे ज्या ज्या गोष्टी मनुष्य करतो किंवा करीत नाही त्यापैकी बहुसंख्य गोष्टी त्याच्या आणि इतरांच्या दृष्टीने तर्कहीन असतात. भीती हा बुद्धिवादाच्या मार्गातील मोठा अडथळा असतो.

कोणत्याही माणसाचे शारीरिक – मानसिक स्वास्थ्य टिकून राहण्यासाठी त्याच्या कामप्रेरणेला समाजमान्य चौकटीत वाव मिळावा लागतो. इतर प्राण्यांना अशा काही चौकटीची गरज नसते. मात्र प्राणीसंग्रहालयातील प्राण्यांच्यासाठी सोयी कराव्या लागतात. लग्नसंस्था अस्तित्वात येण्यापूर्वी मनुष्य-प्राण्यालाही काही अडचणी येत नसत. मात्र या काळांत स्त्रियांवर – विशेषतः सुस्वरूप स्त्रियांवर फार अन्याय होत होता. पुढे शेतीचा शोध लागल्यावर स्त्रियांच्याच आग्रहावरून लग्नसंस्था निर्माण झाली. यामुळे कामव्यवहारांना एक चौकट लाभली. ती अजूनही चालू आहे. ती संपूर्णपणे निर्दोष आहे असे नव्हे; पण पर्यायही नाही. मात्र जे लोक कोणत्याही कारणांमुळे विवाहचौकटीत येत नाहीत किंवा येऊ शकत नाहीत त्यांच्या कामव्यवहारातील तार्किकता आणि बुद्धिवाद कमी होतो; यांची उदाहरणे देण्याची गरज नाही. सिग्मंड फ्रॉइड या मानसोपचार तज्ज्ञाने कामप्रेरणेचा प्रभाव आणि परिणाम यांचा अभ्यास केलेला आहे. त्याचे निष्कर्ष शास्त्रज्ञांनाही धक्कादायक वाटले.

सारांश, भूक, झोप, भीती आणि मैथुन या चौकोनातच बुद्धिवाद काम करीत असतो.

(४)

कार्ल गुस्ताव जुंग या स्विस मनोविश्लेषण-तज्ज्ञाने कार्यकारणभावाचा सिद्धांत मानवी व्यवहाराच्या संदर्भात नाकारला. त्याने त्याचा 'सिंक्रोनिसिटी' चा सिद्धांत मांडला. या इंग्रजी शब्दाला 'कालिक साहचर्य' किंवा 'एकसमयावच्छेद' असा प्रतिशब्द तात्पुरता सुचविता येईल. मानवी व्यवहारात कार्यकारणभावाचा प्रभाव कमी असून एकाच प्रकारच्या घटना एकाच कालखंडात परस्परसंबद्ध ठिकाणी घडू शकतात; असे हा सिद्धांत प्रतिपादन करतो. जर्मन विचारवंतांनी जुंगचा हा सिद्धांत 'त्साइत गाइस्ट' हा प्रतिशब्द वापरून उचलून धरला. या जर्मन शब्दाला इंग्रजीत चपखल असा प्रतिशब्द नाही पण 'स्पिरिट ऑफ द टाइम्स' असा त्याचा अर्थ करता येईल.

आता याची काही उदाहरणे पाहू. इ.स.४७४ साली इटलीतील रोमन साम्राज्य आणि भारतातील गुप्ता साम्राज्य यांचा पाडाव झाला. गौतम बुद्ध आणि वर्धमान महावीर यांनी आपले धर्म थोडे पुढे मागे असे स्थापन केले. रोमन साम्राज्य कोसळल्यानंतर संपूर्ण जगात मध्ययुग (अंधारयुग) सुरू झाले. प्रगतीचे घड्याळ बंद पडले. हे युग सुमारे एक हजार वर्षे चालू होते. पुढे तुर्कांनी इस्तंबूल हे शहर जिंकल्यानंतर बंद घड्याळ पुन्हा चालू झाले. बोल्शेविक क्रांतीनंतर एकामागोमाग एक अशी अनेक राष्ट्रे साम्यवादाकडे वळली. १९९२ साली रशियाने मुक्त अर्थव्यवस्था स्वीकारल्यानंतर हीच सर्व राष्ट्रे मुक्त अर्थव्यवस्थेकडे धावली. १९४७ साली भारत स्वतंत्र झाला. मागोमाग अनेक राष्ट्रे स्वतंत्र झाली. बर्लिनची भिंत पडल्यानंतर लगेच भारत, पाकिस्तान आणि बांगला देश या देशांचे संघराज्य का होऊ नये,

असा प्रश्न जाहीरपणे विचारला गेला. गेल्या काही दिवसांत शेतकऱ्यांच्या आत्महत्या होत आहेत. शेकडो शेतकऱ्यांनी आत्महत्या केल्या. या घटनांचा अर्थ 'त्साइत गाइस्ट' या संकल्पनेने लागू शकेल.

('गतानुगतिको लोकः न लोकः पारिमार्थिकाः' असे भगवद्गीतेत म्हटलेले आहे. ते या संदर्भात आठवते.)

युंग याने आपला दुसरा सिद्धांत 'सामूहिक नेणीव' या नावाने मांडला. युंगच्या मते व्यक्तीप्रमाणेच व्यक्तिसमूहाच्या मनात जाणीव आणि नेणीव असे दोन भाग असतात. ही जन्मजात असते. आपल्या समूहाच्या संस्कृतीची बीजे या नेणिवेत असतात. काही सांस्कृतिक--ऐतिहासिक आकृतिबंध या नेणिवेत रुतून बसलेले असतात. उदाहरणार्थ रामायण आणि महाभारत या महाकाव्यांचे आकृतिबंध आणि पात्रांची नावे भारतीय सांस्कृतिक नेणिवेत घट्ट बसलेली आहेत. या महाकाव्यातील पात्रांची नावे अगणित भारतीयांनी आपल्या अपत्यांना ठेवलेली आहेत. ही दोन महाकाव्ये भारतीयांच्या नेणिवेतून समजा पुसून टाकली तर जे उरेल त्याला भारतीय संस्कृती असे नावही शोभणार नाही. जगात सर्वत्र (भारत सोडून) ज्यू लोकांची जी ससे होलपट झाली त्याला असेच सामूहिक नेणीवेतील संदर्भ कारणीभूत आहेत. हिटलर आणि स्टॅलिन यांनी केलेल्या जुलमांचे स्पष्टीकरण कार्यकारणभावाने मिळत नाही.

(५)

दरम्यान ॲडलर या मानसशास्त्रज्ञाने आपला न्यूनगंडाचा सिद्धांत मांडून कार्यकारणभावाला आणखी एक धक्का दिला. काही व्यक्तींच्या व्यक्तिमत्त्वात काही उणिवा असतात. त्यामुळे ते इतरांपासून वेगळे समजले जातात. इतकेच नव्हे तर त्यांना स्वतःलाही या कमतरतेची जाणीव असते. या जाणिवेतून त्यांच्या काही अतर्क्य कृती होतात. अशा लोकांत अपंग, व्यसनी, वृद्ध, रुग्ण, विधवा, विधुर, कैदी, अनापत्य, ठेंगू इत्यादिंचा समावेश होतो. स्त्रियांनाही पुरुषांबद्दल न्यूनगंड असू शकतो. या वर्गातील व्यक्ती 'हम भी कुछ कम नही' हे सिद्ध करण्यासाठी आक्रमक वृत्ती दाखवितात. लहान मुले खोट्या मिशा लावून मोठ्या माणसांचा अभिनय करतात. हा त्यांच्या तात्पुरत्या न्यूनगंडाचाच आविष्कार असतो. अर्थात न्यूनगंडामुळे चांगल्याही गोष्टी घडतात. सॉक्रेटिस, अब्राहम लिंकन आणि बर्नार्ड शॉ दिसायला तेवढे देखणे नव्हते. याचा वचपा त्यांनी आपापल्या क्षेत्रात दैदीप्यमान यश मिळवून काढला. व्यास ऋषींचीही तीच कथा. महाकवी होमर हा आंधळा होता. मिल्टनला पुढे अंधत्व आले. विदुर, कर्ण आणि लेनार्दो दा विंची अनौरस होते. कुब्जा कुबडी होती. दैत्य गुरू शुक्राचार्य आणि महान योद्धा ॲडमिरल नेल्सन हे दोघे एकाक्ष होते. त्यामुळे न्यूनगंडाचा आविष्कार कसा होईल हे सांगता आले नाही तरी त्याला कार्यकारणभाव नसतो एवढे म्हणता येते; कारण तो एक मनोगंड असतो.

(६)

विसाव्या शतकातील प्रख्यात मानसशास्त्रज्ञ आणि मनोविकारतज्ज्ञ सिग्मंड फ्रॉइड या जर्मन शास्त्रज्ञाने दीर्घकाळ संशोधन करून मानवी मनाबद्दल महत्त्वाचे सिद्धांत मांडले. मानवी मनाचे त्याने जाणीवपूर्व, जाणीव आणि नेणीव असे तीन भाग असतात असे प्रतिपादन केले. या तिन्ही भागांमध्ये आयातनिर्यात होत नसते. या भागांचे नियंत्रण सुपरइगो, इड आणि इगो हे तिघे करीत असतात.

यापैकी फ्रॉईडने जाणीवनेणिवेसंबंधी जो सिद्धांत मांडला तो कार्यकारणभावाच्या विरोधी जातो. नेणिवेच्या भागात व्यक्तीच्या दडपलेल्या इच्छा आणि भावना वसत असतात. जाणिवेला यांचा पत्ता नसतो. या इच्छा आणि भावना प्रचलित सामाजिक मूल्य चौकटीत बसत नसतात. बालपणापासून दडपलेल्या या भावनांचा संचय वाढत जातो. त्या बोलून दाखविता येत नसतात. पण त्यांचे दडपण मनाच्या जाणिवेवर सतत असते. काही वेळा या नेणिवेतील इच्छा व्यक्तीला कृती करायला भाग पाडतात. मानवी मनाचा १/८ भाग

जाणिवेचा तर ७/८ भाग नेणिवेचा असतो. यामुळे चांगल्या चांगल्या व्यक्तींच्या हातून अतर्क्य आणि अनपेक्षित कृत्ये घडून जातात. याची अनेक उदाहरणे देता येतील. शिवधनुष्य अंगावर पडल्यामुळे सीतेसमक्ष अपमानित झालेल्या रावणाला सीताहरण करण्याची इच्छा झाली असेल. सभेत दुर्योधन पाय घसरून पडल्यावर द्रौपदी हसली होती; याची परिणती द्रौपदी वस्त्रहरण प्रसंगात झाली. लेनिनच्या भावाला रशियाच्या झारने ठार मारले होते. लेनिनने पुढे झारचा नष्टांश केला. दक्षिण आफ्रिकेत असताना बॅ. गांधींना एका इंग्रजाने पहिल्या वर्गाच्या डब्यातून सामानासकट फलाटावर फेकून दिले होते; १५ ऑगस्ट १९४७ रोजी म. गांधींनी इंग्रजांना भारतातून काढून लावले. शिवाय त्यांनी पहिल्या वर्गाने कधी प्रवास केला नाही. जनरल याह्याखान हा इंदिरा गांधींना 'दॅट वुमन' असे तुच्छतेने म्हणत असे. बांगला देशात इंदिरा गांधींनी कळ दाबली आणि तिकडे पाकिस्तानात याह्याखान सत्तेवरून उडाला.

या प्रभावी आणि प्रमाथी नेणिवेवर जाणिवेचे नियंत्रण नसते. उलट नेणिवेचाच प्रभाव जाणिवेवर पडत असतो. नेणिवेच्या प्रेरणांमुळे केलेल्या कृतीचे समर्थन व्यक्ती जाणिवेच्या आधारे करू पाहाते. पण ते 'रॅशनलायझेशन' स्वरूपाचे असते. जाणीव-नेणिवेतील या नात्यामुळे कार्यकारणभाव अप्रस्तुत ठरतो.

फ्रॉइड, युंग आणि ॲडलर या तिघांच्या संशोधन आणि सिद्धांतनामुळे कार्यकारणभावनात्मक तार्किक विचारपद्धतीची मानवी व्यवहारात तरी मर्यादा स्पष्ट झाली.

(७)

आणखी एक महत्त्वाची वस्तुस्थिती शास्त्रज्ञांना आढळून आली. ती म्हणजे मूलभूत मानवी स्वभाव म्हणून जो आहे त्यात इतक्या वर्षांत नगण्यच बदल झालेले आहेत. ही मूळ चौकट कायमच आहे. जे बदल झाले ते भौतिक स्वरूपाचे आहेत. पृथ्वीवरील पहिल्या पिढीची जी मानसिकता होती तीच आजपर्यंत कायम आहे; दहापैकी नऊ निर्णय भावनात्मकच असतात असे प्रसिद्ध शास्त्रज्ञ जे. ब्रोनोवस्की याने म्हटलेले आहे. मानवी स्वभावात ज्याप्रमाणे उत्क्रांती नाही त्याचप्रमाणे इतर प्राण्यांतही नाही ही अनुभवाची गोष्ट आहे. उदाहरणार्थ, मांजर आणि उंदीर, साप आणि उंदीर, मुंगूस आणि साप, घार आणि साप, बगळा आणि मासा, कुत्रा आणि मांजर या जोड्यांमधील नातेसंबंधात काही बदल नाहीत. कुत्रा अजूनही इमानीच आहे तर मांजराने आपली बेइमानी सोडलेली नाही. अजूनही मालकाने घर बदलले तरी मांजर घर सोडत नाही आणि कुत्रा मालकाला सोडत नाही. पोपटाच्या वाणीत काही सुधारणा नाही, तर जिराफाला अजून स्वरयंत्र नाही. सारांश, माणसासकट कोणत्याही प्राण्याच्या सहज प्रेरणांत आणि म्हणून मानसिकतेत काही बदल घडून आलेले नाहीत.

मुलगा ऐकत नाही ही तक्रार आजची नाही. धृतराष्ट्र, शहाजी महाराज आणि शिवाजी महाराज यांची तीच तक्रार होती. सावत्र मातेकडून त्रास राम, ध्रुव, संभाजी राजे आणि करवीरचे शाहू महाराज इत्यादिकांना भोगावा लागला. कुंती ज्या अडचणीत सापडलेली होती त्याच अडचणीत आजही महिला सापडतात. द्रौपदी वस्त्रहरण प्रसंगी भीष्म-द्रोणांनी बघ्याची भूमिका घेतली होती. आजही भर रेल्वेडब्यात एखाद्या महिलेवर अत्याचार होत असताना इतर प्रवासी बघ्याचीच भूमिका वठवीत असतात. 'अर्थस्य पुरुषो दासः' असे स्पष्टीकरण भीष्माने बघ्याच्या भूमिकेबद्दल दिले होते. आजही जागतिक बँक आणि आंतरराष्ट्रीय वित्त निधी या संस्थांच्या सूचनेबरहुकूम अनेक राष्ट्रप्रमुखांना चालावे लागते. असो.

(८)

युक्लिडची भूमिती, ॲरिस्टॉटलचे तर्कशास्त्र, न्यूटनचे गतिशास्त्र आणि बेकनचे तर्कशास्त्र या चार खांबावर कार्यकारणभावात्मक बुद्धिवाद उभा होता.

विसाव्या शतकाच्या पहिल्या चरणात अल्बर्ट आईन्स्टाइन या जर्मनीतील ज्यू शास्त्रज्ञाने आपले दोन सापेक्षता सिद्धांत सिद्ध केले. त्यामुळे युक्लिड आणि न्यूटनचे सिद्धांत मागे पडले. साहजिकच ॲरिस्टॉटल आणि बेकनच्या तर्कशास्त्रांना धक्का बसला. युक्लिडच्या भूमितीतील वस्तुजात लांबी, रुंदी, आणि खोली या तीन परिणामांवर आधारित होते. आईन्स्टाइनने 'अवकाशकाळ सातत्य' (स्पेसटाइम कंटिन्यूअम) हे चौथे परिमाण सिद्ध केले. दोन समांतर रेषा एकमेकांना कधीही मिळत नाहीत हे युक्लिडच्या सिद्धांतात प्रमुख तत्त्व होते. आईन्स्टाइनने त्या वाढविल्या असता अवकाशात एकमेकांना भेटू शकतात हे सिद्ध केले. प्रकाशकिरण सरळ रेषेत जातो असे न्यूटन म्हणत असे पण प्रसंगी तो वक्र होऊ शकतो हे आइन्स्टाइनने सिद्ध केले. त्याचा समकालीन शास्त्रज्ञ नील्सबोर याने आपले 'क्वांटम मेकॅनिक्स' पुढे मांडले. ते न्यूटनच्या गतिशास्त्राला पोटात घेऊन पुढे गेले.

आईनस्टाइनच्या सापेक्षता सिद्धांताचे पूर्ण आकलन जगातील फारच थोड्या शास्त्रज्ञांना झाले याचे कारण ते मानवी बुद्धीच्या पलीकडचे आहे असे नव्हे तर त्याला आवश्यक असलेली परिभाषा अजून तयार झालेली नाही हे आहे. सध्याची परिभाषा त्रिमितीय विश्वकल्पनेवर आधारलेली आहे. चतुर्मितीय संकल्पना स्पष्ट करायला ती पुरी पडत नाही ही खुद्द आइन्स्टाइनची तक्रार होती.

अर्थात लोकांना सापेक्षता सिद्धांत पूर्णपणे समजला नाही तरी फारसे बिघडत नाही. त्या सिद्धांताचे जे पडसाद सर्वत्र उमटले ते समजून घेणे फारसे अवघड नाही. महत्त्वाचा परिणाम म्हणजे वस्तुनिष्ठते इतकीच व्यक्तिनिष्ठेला प्रतिष्ठा मिळाली. निरीक्षणाइतकेच निरीक्षकाला महत्त्व आले. वस्तुनिष्ठ असे काही नसून सर्वच सापेक्ष आहे हा विचार मान्य झाला. कार्यकारणभावाची निरपेक्षता कमी झाली. आधुनिक युग संपून आधुनिकोत्तर युग सुरू झाले. विश्वाकडे पाहण्याचे कोणतेही एक दर्शन एकमेव आहे असे मानता येणे अशक्य ठरले. सर्व दर्शने सापेक्ष ठरली. हा आधुनिकोत्तर दृष्टिकोण कोणत्याही घाऊक विचारसरणीला मान्यता देत नाही.

## (९)

कार्यकारणभावाने अनेक घटनांचे स्पष्टीकरण मिळते. म्हणून तर त्याला गेली चारशे वर्षे एवढी प्रतिष्ठा लाभली. मात्र 'योगायोग' या घटनेचे स्पष्टीकरण कार्यकारणभाव आणि तार्किक विचार-प्रणालीने मिळत नाही. अशा घटना प्रत्यही घडत असतात. उदाहरणार्थ, एखाद्याला लॉटरीत बक्षीस मिळते; एखादा खेळाडू क्रिकेटमध्ये शतक काढतो किंवा शून्यावर बाद होतो; एखाद्या मुलीचे लग्न होतच नाही; एखाद्याचा हातातोंडाशी आलेला होतकरू मुलगा मरण पावतो; एखादा पडेल उमेदवार निवडणुकीत भरघोस मतांनी निवडून येतो; ज्या बसने आपण जात असतो तिला अपघात होतो. एखाद्याला आयुष्यात यश म्हणून मिळत नाही; तर एखाद्याने हातात माती घेतली तरी त्याचे सोने होते. कोणी जन्मजात अपंग असतो. कोणी पुढे अपंग होतो. कोणी उपजात वेडा असतो. कोणाला पुढे वेड लागते. अशा घटनांची कारणे शोधण्याचा प्रयत्न संबंधित व्यक्ती किंवा तिचे नातलग करतात. त्यांना संख्याशास्त्रीय उत्तरे देऊन त्यांचे समाधान होत नाही. ही गोष्ट माझ्याच बाबतीत का घडावी हा त्या व्यक्तीचा प्रश्न असतो. या प्रश्नाचे उत्तर मिळविण्यासाठी मग ती सर्वत्र फिरते. योगायोगाचे स्पष्टीकरण तार्किक म्हणजे दोन अधिक दोन चार या पद्धतीने देता येत नाही.

शिवाय दोन अधिक दोन चार या तर्कशास्त्रालाही अलिकडे 'फझी लॉजिक (Fuzzy Logic)' या नवीन तर्कशास्त्राने धक्का दिलेला आहे. जुने तर्कशास्त्र 'बायनरी (Binary)' स्वरूपाचे होते. त्यात दोनच पर्याय असत. 'अ = अ' हा त्याचा पाया होता. नवीन तर्कशास्त्र बहुपर्यायी आहे. उदाहरणार्थ, सफरचंद हे सफरचंद आहे असे म्हणता येईल असे नेहमीच नसते. अर्ध्या खाल्लेल्या सफ[illegible]ल्या का[illegible]






म्हणणार? काळागोरा हे दोनच पर्याय असतात असे नाही; मध्ये सप्तरंग असू शकतात. या फझी तर्कशास्त्रावर आधारलेली यंत्रेसुद्धा आता निर्माण झालेली आहेत.

(१०) सारांश, बुद्धीचे महत्त्व राहिले पण बुद्धिवादाचे महत्त्व कमी झाले. बुद्धीप्रमाणे इतरही काही गुणधर्म माणसाच्या अंगी असतात; तेही महत्त्वाचेच असतात असे निदर्शनास आले. परीक्षेतील टक्केवारी प्रमाणेच बुद्धिगुणंक आणि भावनांकही महत्त्वपूर्ण असतात हे मान्य करावे लागले. संपूर्ण व्यक्तिमत्त्वाचा एकात्मिक विकास हे शिक्षणाचे उद्दिष्ट असले पाहिजे हे सिद्ध आणि मान्य झाले.

प्रामाणिकपणा, नेतृत्व, उपक्रमशीलता, सकारात्मक विचारसरणी, निर्भयता, कामसूपणा यांसह इतर अनेक गुणांना बुद्धीइतकेच महत्त्व आहे. मात्र हे गुण मोजायच्या फूटपट्ट्या अजून उपलब्ध नाहीत. सध्या त्यासाठी प्रशिक्षण वर्ग किंवा शिबिरे घेतली जात आहेत.

भारतातील ज्या राजकीय पक्षांनी बुद्धिवादाला अतिरिक्त महत्त्व दिले त्यांना जनसामान्यांचा पाठिंबा मिळाला नाही हा इतिहास आहे. ज्या पक्षांनी मनुष्य हा बुद्धिवादी असला तरी तो प्रथमतः एक संवेदना, भावना आणि विकारयुक्त प्राणी आहे, हे गृहीत धरून पक्ष चालविले त्यांना जनमताचा कौल मिळतो हे अनेकवार सिद्ध झालेले आहे.

मनुष्य हा बुद्धिवादी प्राणी आहे, ही व्याख्या बदलण्याची गरज नाही. मात्र आजवर 'बुद्धिवादी' या विशेषणावर अवास्तव भर दिला गेला तो इथूनपुढे तरी 'प्राणी' या नामावर पुरेशा प्रमाणात दिला पाहिजे. ते कालसुसंगत ठरेल. अवकाश सुसंगतही ठरेल.

❋ ❋ ❋

# एका शिक्षकाची डायरी

## अरुण रंधे

आज दिनांक ८ फेब्रुवारी २००८, शुक्रवार. रात्रीचे आठ वाजले आहेत. मी नुकत्याच झालेल्या घटक चाचणीच्या उत्तरपत्रिका तपासतो आहे. विषय - मराठी (प्रथम भाषा), इयत्ता ९ वी च्या या उत्तरपत्रिका आहेत. प्रश्नपत्रिकेत प्रश्न विचारला आहे -

- संत बसवेश्वरांची शिकवण आजही काळाशी सुसंगत का वाटते? विद्यार्थ्याने उत्तर खालीलप्रमाणे लिहिले आहे -

'संत बसवेश्वरांची शिकवण आजही काळाशी सुसंगत व ते उपमा शांतिनाथ हे एक भोपडी महाराज सुरू केले होते.'

प्रश्नपत्रिकेत दुसरा प्रश्न विचारला आहे -

- शांतिनाथावर कोणते संकट कोसळले होते?

विद्यार्थ्याने लिहिलेले उत्तर खालीलप्रमाणे आहे,

'शांतिनाथावर वृक्ष माझा सखा या संकट कोसळले होते.'

दोन्ही वाक्यातून कोणताही बोध होत नाही. मूळात दोन्ही 'वाक्ये' वाक्येच नाहीत. निरर्थक शब्दसमूह त्याने लिहिले आहेत. संपूर्ण उत्तरपत्रिका अशा निरर्थक शब्दसमुच्चयानी भरली आहे. उत्तरपत्रिका लिहिताना 'नीटनेटकेपणा' हे मूल्य बऱ्यापैकी रुजलेले दिसत आहे. पूर्ण उत्तरपत्रिका मनापासून सोडविली आहे. तथापि सुसंगत वाक्यरचना, शब्दसमूह कोठेही आढळत नाही. विद्यार्थ्याला अतिशय कमी गुण मिळाले. ४० पैकी ०३.

किती गुण मिळाले? हा विद्यार्थी पास होईल की नापास? असे 'काळजीवाहू' प्रश्न माझ्यासमोर नाहीत. माझ्या समोर प्रश्न आहे; एवढ्या साध्या प्रश्नांचीही उत्तरे, या विद्यार्थ्याला का बरे लिहिता येत नाहीत? मराठीचा शिक्षक म्हणून माझे काही चुकले का? याला या आधी लाभलेल्या शिक्षकांचे काही चुकले का?

माझी शाळा एक नावलौकिक असलेली, ध्येयवादी शिक्षकांनी काढलेली शाळा आहे. याच शाळेतील मी दुसऱ्या पिढीचा शिक्षक आहे. माझा, माझ्या शाळेचा, या शिक्षणव्यवस्थेचा का बरे असा पराभव होतो आहे?

अनेक प्रश्न फेर धरून नाचत आहेत : उत्तरे मात्र फिरकत नाहीत.

रोज काहीतरी वाचन केल्याशिवाय मी बहुधा झोपत नाही. वाचन साधारणतः वैचारिक स्वरूपाचे असते. या वाचनात वेगवेगळ्या मुद्द्यांवर आपल्या अंतर्मनात वेगवेगळ्या आंतरक्रिया होत असतात. केव्हा केव्हा तर लेख वाचलेलेच असतात. परंतु अंतर्मनात होणाऱ्या आंतरक्रिया पूर्वी कधीच न झालेल्या असतात.

परवाच्या दिवशी मी 'नवभारत' चा 'शिक्षण व समाजपरिवर्तन विशेषांक, सप्टेंबर ते डिसेंबर २००३' वाचत होतो. यात पृष्ठ क्र.४५ वर एका चौकटीत देवदत्त दाभोलकर लिहितात,

"ज्याला शिकण्याची इच्छा नाही त्याला शिकविण्याचा प्रयत्न करू नये.

ज्याला शिकण्याची इच्छा आहे त्याला काहीही शिकविता येते. ज्याला काहीही शिकण्याची इच्छा नाही असा एकही माणूस जगात नाही.

कोणाला काय शिकायचे आहे हे ओळखून त्याला ते शिकविण्याची व्यवस्था करणे हे शिक्षणव्यवस्थेचे कार्य आहे.

जिज्ञासा जागृत करतो, अधिकाधिक प्रखर

करतो व ती शमविण्याचे मार्ग आपले आपण कसे शोधावेत याचे मार्गदर्शन करतो तोच खरा शिक्षक. नव्हे, परात्पर गुरू."

- देवदत्त दाभोलकर.

एकंदरीत अतिशय खुबीने देवदत्त दाभोलकर सांगतात की, ज्याची शिकण्याची इच्छा नाही असा माणूस शोधूनही सापडणार नाही. प्रत्येकाला शिकण्याची आंतरिक ऊर्मी, आवड असतेच. तेव्हा त्याला जे काही शिकायचे आहे ते ओळखून, ते शिकवण्याची व्यवस्था शिक्षणव्यवस्थेने केली पाहिजे. तसेच प्रत्येकाला काय हवे आहे याचा शोध शिक्षणव्यवस्थेने, शिक्षकाने घेतला पाहिजे. विद्यार्थ्यांची जिज्ञासा अधिकाधिक प्रखर केली पाहिजे व परात्पर गुरुने ती शमविली पाहिजे.

कुठेही वादविवादाचा आविर्भाव न आणता दाभोलकरांचे हे म्हणणे मान्य करावे लागते. देशातील अनेक शिक्षक या परात्पर गुरु पदाला प्राप्त झाले आहेत; होत आहेत. त्यांना आदर्श शिक्षकाचा पुरस्कार मिळाला असेल किंवा नसेल. प्रश्न तो नाही.

प्रश्न आहे, व्यवस्थेत काम करीत असताना स्वतःला व्यवस्थेची संरचना बदलण्याचा, प्रसंगी व्यवस्था झुगारून देण्याचा अधिकार असतो का? मी कोणाला शिकवावं? कसं शिकवावं? केव्हा शिकवावं? काय शिकवावं? शिकवलेल्या भागाचं मूल्यमापन कसं करावं? इत्यादी सर्व बाबींवर व्यवस्थेच्या अंतर्गत एका चौकटीत मला काम करावे लागते. ३० मिनिटांची एक तासिका, एका तासिकेत ५५ ते ६० विद्यार्थी. प्रत्येक विद्यार्थ्याची एक मनोकायिक संरचना, त्याने अर्जित केलेल्या अध्ययन क्षमता, त्याने धारण केलेले वेगवेगळे मनोगंड. त्यातून जीवनाकडे पाहण्याचे विकसित झालेले वेगवेगळे दृष्टिकोन. या अंगाने समोर बसणाऱ्या विद्यार्थ्यांचे वर्गीकरण केल्यास सतत बदलणारे आलेख नजरेसमोर तरळत असतात. समोर बसणारे विद्यार्थी माझ्या अध्यापनाकडे, समोरच्या पुस्तकाकडे पाहत असतात. याचा अर्थ ते माझ्या अध्यापनाकडे लक्ष देतातच, त्यातून काही शिकतातच, असे नव्हे. त्यांचे मन वर्गखोलीबाहेर आपल्या आवडत्या विषयात भटकत असते. माझी 'साचेबद्ध' पोपटपंची त्यांना नको असते.

'साचेबद्ध पोपटपंची'ला पूरक व प्रेरक होतील असे प्रयोग व्यवस्थेची चौकट सांभाळून मी नेहमीच करतो. त्याचे तात्कालिक चांगले परिणामही दिसून येतात. तथापि कायमस्वरूपी परिणामांमध्ये त्यांचे रूपांतर होत नाही. कदाचित् पुष्कळशा मर्यादा व्यवस्थेच्या असतील तशा काही माझ्याही असू शकतील. 'मिशनरी' वृत्तीने हे गृहीतक मी स्वीकारले नसेल, वगैरे -

पर्यायाने 'मी एक साधा यशस्वी शिक्षकही नाही' ही टोचणी मनाला लागलेली असते. 'चला आता चार वर्षेच राहिली' या नकारात्मक कालगणना पद्धतीने मी सेवानिवृत्तीकडे वाटचाल करीत असतो.

गेल्या काही दिवसांपासून प्रा. रमेश पानसे नावाच्या बालशिक्षणात रमलेल्या एका शिक्षणतज्ज्ञाचा सहवास मला लाभला आहे. बालशिक्षणात काम करणारं एक अतिशय अभ्यासू, व्यासंगी, प्रयोगशील व प्रामाणिक व्यक्तिमत्त्व म्हणून मी त्यांना मानतो. आधुनिक काळात झालेले मेंदूसंशोधन व हॉवर्ड गार्डनरने मांडलेला बहुविध गुणवत्तांचा सिद्धांत अधोरेखित करून 'कोणताही विद्यार्थी 'ढ' नसतो' अशी मांडणी ते सतत करीत असतात.

जन्म झाल्यापासून किंबहुना गर्भावस्थेपासूनच मूल सतत ज्ञान मिळवीत असते. आपण मिळविलेल्या ज्ञानाची रचना ते स्वतःच करीत असते. आधी मिळविलेल्या ज्ञानाची तुलना नव्या ज्ञानाशी करणे; नव्या जुन्याचे वर्गीकरण, विश्लेषण करून आपला ज्ञानसाठा अद्यावत करीत राहणे, इत्यादी कामे मूल सतत करीत असते. हा ज्ञानसाठा आणि त्याच्याशी संबंधित कौशल्ये साठविण्याचे काम त्याच्या मेंदूतील कोट्यवधी न्यूरॉन्स पेशी एकमेकांना जोडून घेऊन करीत असतात. न्यूरॉन्स पेशींचे हे कार्य साधारणतः ८ व्या वर्षापर्यंत पूर्ण होत

असते. आपल्या ज्ञानाची ही रचना जसे हे मूल स्वतःच करते तसेच नवीन ज्ञान आत्मसात करण्याचा त्याचा वेगही ते स्वतःच ठरविते. अधिक वेगाने ज्ञानाचे आकलन करणारे मूल हुशार नसते किंवा उशिरा आकलन होणारे मूल 'ढ' नसते हे समजून घ्यावे लागते.

याच काळात मुलाच्या दैनंदिन वर्तनाचे नकळत बारकाईने निरीक्षण केले तर त्यांचे कल ओळखू येतात. त्यांचा कल ज्या क्षेत्रात असेल त्या क्षेत्रात ती अधिक रमतात किंवा अधिक प्रगती करतात. इतर क्षेत्रे दुय्यम पातळीवर राहतात. एखाद्याला संगीतात चांगली रुची असेल तर दुसऱ्याला मुक्या प्राण्याशी छान छान बोलता येत असेल. एखादा माकडासारखा भरभर चढत असेल तर दुसरा रोपट्यांचे संगोपन चांगला करीत असेल. एखादा आपला मुद्दा दुसऱ्याला चांगला पटवून देत असेल तर दुसरा गणितातील कूट प्रश्न सोडवीत असेल. ही सर्वच मुलं सारखीच हुशार असतात. फक्त त्यांच्या हुशारीची क्षेत्रे वेगवेगळी असतात. हॉवर्ड गार्डनरने याच बाबी शास्त्रीय संशोधनाच्या ढाच्यात मांडल्या. त्याला अत्याधुनिक मेंदूसंशोधनाने सिद्ध झालेले पुरावे जोडले. यालाच हॉवर्ड गार्डनरच्या 'बहुविध बुद्धिमत्तांचा सिद्धांत' म्हणतात.

महाराष्ट्रात बालशिक्षणाच्या क्षेत्रात कार्यरत असलेले ज्येष्ठ शिक्षणतज्ज्ञ प्रा. रमेश पानसे हॉवर्ड गार्डनरच्या या सिद्धांतामागे भक्कमपणे उभे राहिले आहेत. ग्राममंगल आणि इतर प्रयोगशील शाळांमधून या सिद्धांतावर त्यांचे काम सुरू आहे.

"कोणतेही मूल 'ढ' नसते" तर त्याच्या बुद्धिमत्तांचा पट इतरांपेक्षा वेगळा असतो ही त्यांची भूमिका मला पटलेली असते. एक शिक्षक म्हणून मी अपयशी का होतो आहे, याची कारणे मला दृगोच्चार झालेली असतात. तरीही ४० पैकी ०३ गुण देऊन एका विद्यार्थ्याचे नव्हे तर कित्येक विद्यार्थ्यांचे मी सीमांतीकरण केले असते, त्याला 'ढ' ठरविले असते. त्याचा आत्मविश्वास खच्ची केला असता.

ज्यांना मी 'ढ' ठरवितो आहे त्यांच्यातील गुणवत्ता ओळखून, त्यांचा उपयोग करून 'जाणता राजा' अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत स्वराज्याची स्थापना करू शकला तर याच 'ढ' च्या भरवश्यावर गांधींनी सत्याग्रही वाटचाल करून स्वातंत्र्यलढ्याचे रणशिंग फुंकले. हे सर्व कर्तृत्व शालेय जीवनात 'गुणवान' ठरलेल्या मोजक्या विद्यार्थ्यांचे नव्हते तर शालेय जीवनात यथातथाच असणारे, शाळेचे तोंडही न पाहिलेले कितीतरी 'गुणवान' या यशाचे मानकरी होते.

आपल्या प्रचलित शिक्षणव्यवस्थेत सर्वांचाच पराभव होत आहे, असे सकृतदर्शनी दिसत आहे. शिक्षणमंत्र्यापासून शिक्षक, विद्यार्थी, पालक सर्वचजण एकमेकांना आरोपीच्या पिंजऱ्यात उभे करीत आहेत. एकमेकांकडे संशयाने पहात आहेत.

प्रत्यक्षात काय होते आहे? घरी, दारी, शाळेत विद्यार्थ्यांचे नैसर्गिकरीत्या फुलण्याचे अधिकार हिरावून घेतले जात आहेत. त्यांनी कसे फुलायचे हे आपण ठरवतो आहे. "मी तुझ्या शिक्षणासाठी पाहिजे तेवढा पैसा खर्च करायला तयार आहे, पण तू डॉक्टर/इंजिनियरच झालं पाहिजे" अशा महत्त्वाकांक्षा जगजाहीर बोलल्या जात आहेत. आई, वडील, शिक्षक कोणीही बालकाला प्रेमाची ऊब द्यायला तयार नाहीत. त्याच्या भावनिक गरजा काय आहेत? आवडी निवडी काय आहेत? त्याचा कल कोणीकडे आहे? हे पहायला कोणाला फुरसत नाही.

आर्थिकदृष्ट्या सुस्थिर असलेला समाज अधिक संपन्नतेकडे धाव घेण्यातच आपला वेळ खर्ची घालतो आहे. शेअरमार्केटमधील निर्देशांकानुसार त्यांचे चेहरे प्रफुल्लित होतात किंवा नैराश्याने कोसळतात. दोन्हीही अवस्था मनोरुग्णतेच्याच निर्देशक असतात. अशा 'संपन्न' वातावरणात घरच्या मुलाने ओढलेल्या रेघोट्यांचे व त्यातून होणाऱ्या अभिव्यक्तीचे कौतुक करायला कोणाला फुरसत आहे!

शारीरिक श्रम हेच ज्याचे भांडवल आहे, गुंतवणूक आहे; अशा समाजाला रोजची रोजी-रोटी






मिळवणे कठीण झाले आहे. अशा अवस्थेत ज्या देवाने ही मुल दिलीत, तोच त्यांचा कर्ता – करविता आहे; या अगतिकतेत हा समाज जगतो आहे.

अशा रीतीने ही सर्व मुले 'संपन्न' घरात अतिकौतुकाचे, लाडाचे जीवन जगत आहेत तर 'विपन्न' घरात उपेक्षेचे दुर्लक्षित जीवन जगत आहेत. अशावेळी बाजार हेच ज्यांचे ध्येय आहे, त्या माध्यमजगताकडे ही मुलं खेचली जातात. स्पर्धा, हिंसा, प्रतिशोध, सेक्सचे नको तेवढे दर्शन त्यांना झालेले असते. घरात, समाजात हीच मूल्ये प्रतिष्ठित होत असताना त्यांना दिसतात.

'श्यामची आई' केव्हाच रद्दीत विकलेली असते. असलीच तर सुडौल बांध्याचे उन्नत दर्शन घडविणारी गुळगुळीत पाने असलेली मासिके घरात टिपॉयवर पडलेली असतात. मुलाला ट्यूशनला पाठवून मम्मी त्यातल्या ब्यूटी टिप्स वाचणार असते.

त्याचवेळी शिक्षणावर शासनाचे हजारो कोटी रुपये खर्च झालेले असतात. स्त्री शिक्षणात भारताचा शेवटून पाचवा क्रमांक आलेला असतो. युनेस्कोने भारतीय मुलीचेच चित्र अहवालाच्या मुखपृष्ठावर छापलेले असते.

वसंतराव पुरके, प्रा. रमेश पानसे, हेरंब कुलकर्णी वेगवेगळे मुद्दे घेऊन जिवाच्या आकांताने ओरडत असतात, समाजाला जागे करीत असतात. समाजाला आवाहन करीत असतात.

अशावेळी मी एक असहाय्य शिक्षक म्हणून इच्छा नसतानाही घटक चाचणीचे हे अर्थशून्य पेपर्स तपासत असतो.

'दिल्ली मार्केट'चा एक वारकरी झालेलो असतो.

❋ ❋ ❋

## काल, आज आणि उद्या

# हास्य-विनोदाची मीमांसा

### साक्षी

विनोदाचे नाना प्रकार असले तरी व्याख्या मात्र एकच आहे. ती अशी की, विनोद हा हास्यप्रेरक असतो. अवचित हास्य निर्माण होताना चेहऱ्यातील पंधरा स्नायूंचे एका विशिष्ट घाटाने आकुंचन होते आणि त्याच वेळी श्वासोच्छ्वासाचा तालही बदलतो. अंधूक स्मितापासून खळखळाटी हसण्यापर्यंतचे जे विविध हास्य प्रकार आहेत ते वरचा ओठ उचलणाऱ्या स्नायूला विजेचा किती तीव्रतेचा झटका मिळतो आणि त्या स्नायूपासून चेहऱ्यातील इतर स्नायूंपर्यंत किती शक्तीचे विद्युत् प्रवाह पसरतात त्यावरून ठरतात. इथे आपण अवचित हास्याचा विचार करतो आहोत, हे लक्षात ठेवले पाहिजे. इतर हास्ये ही सुसंस्कृत मनुष्याने ओढून ताणून आणलेली असतात किंवा अडविलेली असतात. उदा. वरिष्ठ अधिकाऱ्याच्या काही वाक्यांवर कनिष्ठ माणूस कृत्रिम तऱ्हेने गडगडाटी हसतो किंवा वडीलधाऱ्या मनुष्यासमोर तरुण मंडळी येणारे हासू औपचारिकता म्हणून दाबून ठेवतात. अशा हास्याचा विचार आपण इथे करीत नाही.

हसणे ही एक प्रतिक्षिप्त क्रिया आहे, हे ध्यानी घेतले की, आपल्यापुढे अनेक कोडी उभी राहतात. डोळ्यावर प्रकाशाचा झोत पडला तर बुबुळे आकसतात. एका साध्या प्रेरकाला उत्तर म्हणून ही क्रिया होते. पण या क्रियेचा उपयोग अगदी उघड आहे; तो म्हणजे, दृष्टी शाबूत ठेवणे. पण आपण हास्य ही किती गुंतागुंतीची प्रतिक्षिप्त क्रिया आहे, ते पाहिले; हसण्यापासून कोणता रोकडा फायदा आपल्याला होतो? शरीराच्या कोणत्या अवयवाच्या संरक्षणासाठी हास्याचा उपयोग होतो? हसणे या प्रतिक्षिप्त क्रियेचे हे वैशिष्ट्य आहे की, त्या क्रियेपासून जीवशास्त्रीय फायदा असे ज्याला म्हणता येईल, असा कोणताच फायदा दिसून येत नाही. म्हणजे हसणे ही मनुष्याला मिळालेली एक अगांतुक प्रक्षिप्त क्रिया म्हटली पाहिजे. आपण उद्दिष्टप्राप्तीसाठी परिश्रम करतो, त्यामुळे नाना प्रकारचे मानसिक तणाव आपल्याला सहन करावे लागतात. त्या तणावांपासून सुटका मिळवी एवढाच हसण्याचा उपयोग आपल्याला होतो.

हसण्याच्या संबंधातले दुसरे कोडे असे की, हास्याचा प्रेरक आणि त्या प्रेरणेला मिळणारा प्रतिसाद या दोन्हीच्या जटिलतेत असणारा फार मोठा फरक. आपल्या गुडघ्याच्या खालच्या स्नायूवर पट्टीने बारकासा प्रहार केला तर आपला पाय वर उचलला जातो; येथे प्रेरणा व प्रतिसाद ह्या दोन्ही गोष्टी केवळ शारीर स्वरूपाच्या असतात. एखादा विनोद किंवा विनोदी गोष्ट वाचणे किंवा ऐकणे ही गुंतागुंतीची मानसिक प्रक्रिया आहे; पण तिला मिळणारा हास्यरूपी प्रतिसाद हा केवळ शारीर पातळीवरचा आहे. प्रेरणा व प्रतिसाद यांच्यातील ही तफावत हे प्लेटोपासून अनेक विचारवंतांना पडलेले कोडे आहे.

एखादा गायक गातो तेव्हा त्याला निरनिराळ्या श्रोत्यांकडून मिळणारी दाद वेगवेगळ्या हावभावातून व्यक्त होते. कोणी माना डोलवितात, कोणी 'हा !' असा उद्‌गार काढतात, कोणी हातांनी अगर पायांनी ताल धरतात. पण पु.ल. देशपांड्यांसारख्या वक्त्याने केलेल्या विनोदाला मिळणारी दाद मात्र एकाच प्रकारची म्हणजे 'खळखळाटी हास्यांतून मिळणारी असते. विनोद फसला किंवा यशस्वी झाला हे ठरविण्याचा एकच निकष आहे. तो म्हणजे ऐकणाऱ्याला 'हसू फुटले की नाही?' हा. माणसांच्या दळण-वळणाच्या (कम्युनिकेशन) माध्यमात विनोद हे एकच माध्यम असे आहे की, जेथे अतिशय गुंतागुंतीच्या प्रेरणेपासून अगदी ठराविक असा प्रतिसाद,

व तोही शारीर स्वरूपाचा मिळतो. एखाद्या स्थळी रेडिओॲक्टिव्हिटी आहे की नाही याचा प्रत्यय 'गैजर कौंटर' नावाच्या यंत्रातून मिळतो, हे जितके ठरावीक आहे तितकेच अमुक एका बोलण्यात विनोद आहे याचा प्रत्यय श्रोत्यांच्या हसण्यातून मिळतो, हे देखील ठाम आहे. दुसऱ्या कोणत्याच कलेच्या बाबतीत असा निश्चित व ठरावीक पडताळा मिळताना दिसत नाही. उदात्ततेकडून हास्यास्पदतेकडे येणे जसे शक्य आहे तसे हास्यास्पदतेपासून उदात्ततेकडे परतणे ही शक्य आहे; त्यामुळे असे वाटते की, हास्यास्पद गोष्टींच्या अभ्यासातून उदात्ततेचा मागोवा घेणे शक्य होईल.

(१)

हसायला येण्यासाठी जो अनुभव कारण होतो तसल्या अनुभवाच्या नाना परी असतात. मनुष्याच्या शरीराला गुदगुल्या केल्या तर तो हसतो, त्याप्रमाणे त्याच्या मनाला गोंजारले तरी तो हसतो. पण हास्य निर्माण करणाऱ्या या वेगवेगळ्या अनुभवांना एकाच प्रकारचा घाट असतो व त्यातून विनोदाचे तर्कशास्त्र शोधून काढता येते, असे आपण आता पाहू. त्यासाठी काही उदाहरणे घेऊ.

(१) आत्मपीडक (मॅसोकिस्ट) मनुष्य कसा ओळखावा? त्याला गार पाण्याने आंघोळ कराविशी वाटत असते, तेव्हा तो पाणी तापवून घेतो.

(२) आमची आजी अगदी श्रद्धाळू होती. आजोबा वारल्यानंतर कोणीतरी तिला विचारले, "आजोबा आता कोठे असतील?" तेव्हा ती म्हणाली, "ते नक्की स्वर्गसुख उपभोगीत असतील; पण कशाला उगीच त्या दुःखाच्या गोष्टीबद्दल बोलावे?"

(३) माझ्या काकांना मूत्रपिंडाचा त्रास होता. ते डॉक्टरकडे गेले तेव्हा डॉक्टर त्यांना म्हणाले, "काका, तुमचा आजार भयंकर आहे. दहापैकी एखादा मनुष्य त्यातून वाचतो. पण चांगले झाले की, तुम्ही माझ्याकडे आलात. अहो, गेल्या सहा महिन्यात हाच आजार घेऊन नऊ रोगी माझ्याकडे आले आणि सगळे गेले की, हो तुम्ही नक्की वाचणार बघा!"

(४) "मी तुमच्या मुलीचा हात माझ्या हाती द्या, असे विनवायला आलो आहे." "मग घ्या की! नाही तरी तिचे बाकी शरीर तुम्ही पूर्वीच घेतले आहे!"

(५) सरदारजी स्वारीहून परत येण्याच्या दिवशी घरी सत्यनारायण होत होता. सरदारजी गढीत गेले आणि पाहतात तो त्यांच्या दिवाणखान्यात सत्यनारायणाच्या पूजेचे साहित्य मांडले आहे. ते शय्यागृहात गेले तेव्हा त्यांना दिसले की, त्यांची पत्नी उपाध्यायाच्या मिठीत सुखावली आहे. सरदारजी दिवाणखान्यात येऊन भटजींच्या पाटावर बसले व मोठ्याने पोथी वाचू लागले. सरदारीणबाई धावत आल्या व म्हणाल्या, "अहो, हे काय करता आहात?" सरदारजी उत्तरले, "भटजीबोवा माझे काम करीत होते म्हणून मी त्यांचे काम हाती घेतले!"

या पाच चुटक्यात काही साम्य दिसते का? शेवटच्या विनोदाचा थोडा विचार केला, तर असे आढळते की, सरदारजींचे वागणे अनपेक्षित आहे, पण तर्कशुद्ध आहे. फक्त इथला तर्क हा इथे उपस्थित असलेल्या परिस्थितीला सहसा लावला जात नाही. सरदारजींनी इथे श्रमविभागाचे नियम लागू केले आहेत. संस्कृती निर्माण झाली तेव्हापासून श्रमविभागणी लोकांनी मान्य केली आहे. पण चुटक्यात जो प्रसंग आहे- – सरदारीण उपाध्येबोवांच्या मिठीत आढळली — त्या ठिकाणी वैवाहिक नीतीचे नियम लावले पाहिजेत, अशी आपली अपेक्षा असते. एकाच प्रसंगाला दोन, परस्परांपासून अगदी भिन्न, अशा नियमसंहिता लावल्या गेल्याने विनोद निर्माण झाला. श्रमविभागाची नियम – संहिता आणि वैवाहिक नीतीची नियम – संहिता या दोन्ही आपापल्या ठिकाणी पूर्णपणे सुसंगत आहेत. पण त्या संहिता परस्परांशी ज्यांचा मेळ बसेल, अशा नाहीत. एकाच परिस्थितीवर एकाच वेळी दोन भिन्न दृष्टिकोनांतून पाहिल्यामुळे हा विनोद वाचणाऱ्याला एकाच वेळी दोन वेगळ्या लाटांवर आंदोलण्याचा भास होतो व त्यातून हसू फुटते. जोपर्यंत सरदारजींची

श्रमविभागणीची चौकट आणि वाचकाची वैवाहिक – नीतिमत्तेची चौकट अशा चौकटीत एकच प्रसंग बसविण्याचा खटाटोप चालतो – किंवा एकाच प्रसंगाला दुहेरी संदर्भ मिळतो – तेव्हा विनोद निर्माण होतो. "दुहेरी संदर्भ" हा शब्दप्रयोग विशिष्ट उद्देशाने वापरला आहे. पद्धतशीर विचार जेव्हा चालत असतो तेव्हा त्याची घडण एकाच सलग विचारविश्वात होत असते. एकाच प्रतलावर चाललेली असते, असेही म्हणता येईल. पण सृजनशील विचारपद्धती अशा शिस्तीत राहू शकत नाही. ती एकाच वेळी विविध प्रतलांवर चालत असते. विनोदाच्या बाबतीत असेच घडते. विनोद निर्माण करणारा व निर्माण झालेल्या प्रसंगाकडे विनोद म्हणून पाहणारा हे दोघेही एका पातळीवरून दुसऱ्या पातळीवर - – किंवा त्या प्रसंगाशी संबद्ध अशा एका संदर्भ चौकटीतून दुसऱ्या संबंध चौकटीवर–आदळतात तेव्हा दोघांनाही सुखद धक्का बसतो. त्यातून हास्य–निर्मिती होते.

आता दुसऱ्या चुटक्यांकडे वळू या.

आशाळभूत प्रियकर सासऱ्याकडे त्याच्या मुलीचा "हात" मागतो, तेव्हा "हात" या शब्दाला एक सांकेतिक अर्थ जोडून तो मागणी करीत असतो. मग (भावी) सासरा मात्र "हात" या शब्दाच्या सांकेतिक अर्थाकडे दुर्लक्ष करून त्याचा "शरीराचा अवयव" असा गद्य अर्थ घेतो. "हात" या शब्दाचा सांकेतिक संदर्भ उद्ध्वस्त होऊन एका एकी त्या शब्दाला "शारीर" संदर्भ मिळतो व त्यातून विनोद निर्माण होतो.

विधवा आपल्या नवऱ्याच्या मृत्यूकडे एकाच वेळी एक "दुःखद गोष्ट" आणि "स्वर्ग–गमन" या दोन संदर्भातून पाहाते. प्रत्येक मनुष्य "श्रद्धा आणि विवेक" अशा परस्पर विरोधी जोडगोळीच्या कचाट्यात राहून अनुभव घेत असतो हे या विनोदातून लख्खपणे आपल्या निदर्शनास येते व या अचंब्यातून आपण हसतो. विनोद साधा आहे. बरेचदा अनुभवाला येणारा आहे. पण त्याच्याशी निगडित जी अचानक जुळलेली आंदोलने आहेत; त्यांचा झोका मनोज्ञ आहे.

डॉक्टर आणि रोगी यांच्यातील संभाषणातही संबद्ध अशा दोन संदर्भातील विरोध आपल्यासमोर चमकून जातो. डॉक्टराचा विचार हा "संभाव्यता शास्त्रा"च्या संदर्भात चालला आहे. या शास्त्रातील नियम एकाकी किंवा सड्या प्रसंगाला किंवा व्यक्तीला लावता येत नाहीत. आणखी तिढा असा आहे की, सध्या उपस्थित असणाऱ्या रोग्याचे काय होणार याच्या संभाव्यतेशी आधीच्या रोग्यांच्या बाबतीत काय घडले, याचा कोणताच संबंध नाही. सध्या उपस्थित असणाऱ्या रोग्याच्या जगण्याची संभाव्यता १/१० च आहे. त्यामुळे "पूर्वीचे ९ रोगी दगावले तेव्हा तू आता जगणारच," हा विश्वास पूर्णपणे अनाठायी आहे. हा विनोद म्हाजे एक कोडेच आहे.

रोज गार पाण्याने अंघोळ करणारा आत्मपीडक जेव्हा गरम पाण्याने अंघोळ करतो तेव्हा खरे तर तो स्वतःकडे सुख ओढून घेत असतो. पण विनोदकार त्या गोष्टीला "आत्मपीडितां"ची डूब देतो आहे. "मला गार पाण्याचे स्नान करायला आवडते; पण मी स्वतःचा छळ करून घेणारा आहे. म्हणून मी गरम पाण्याने स्नान करतो" हे म्हणण्यात जी आत्मवंचना आहे ती विनोद कर्त्याने उपरोधिक पद्धतीने उघडकीला आणली आहे. विनोदकर्त्याने "आत्मपीडिका"ची विचारपद्धती उचलून त्यातील विसंगती किंवा लबाडी उघड्यावर आणली आहे.

सर्व चुटक्यांच्या बाबतीत आपणास असे दिसून येते की, एखादा प्रसंग किंवा कल्पना हिच्याकडे आपण जर स्वतःशी सुसंगत परंतु परस्परांशी ज्यांचा मेळ बसत नाही अशा दोन संदर्भ चौकटीतून पाहिले तर विनोद घडून येतो. तथापि, विनोदाचे हे स्पष्टीकरण केवळ तार्किक असल्याने एकांगी आहे. विनोदाला एक भावनांच्या खळबळीचे अंग असते. त्यामुळे विनोद हा कोरडा न राहता त्याला रसाळपणा येतो. या बाजूचा आता विचार करू.

अनुक्रमणिका

(२)

एखादा विनोदवीर जेव्हा गोष्ट सांगतो तेव्हा प्रथम तो श्रोत्यांच्या मनामध्ये एक तणाव उत्पन्न करीत जातो. जसजसे निवेदन पुढे जाते, तसतसा तणाव वाढत जातो. पण हा तणाव अपेक्षित अशी उत्कटतेची उंची गाठत नाही. त्यातील कळीचे वाक्य त्या गोष्टीचा जो तार्किक विकास होत असतो त्याच्यावर घणाचा घाव पडावा तसे पडते आणि गोष्टीतील नाट्यपूर्णतेचा विरस करून टाकते. श्रोत्यांना जो ताण जाणवत होता तो एकाएकी सैल पडतो आणि फुगा फुटावा तसा हास्यस्फोट निर्माण होतो. असे दिसते की, भावनांचा आवेग अचानक निरर्थक वाटू लागतो व त्या आवेगाला शारीरिक हालचालीतून सहज वाट मिळावी असे वाटून हसायला येते. आपण वर म्हटले आहे की, हास्य ही एक अगांतुक प्रतिक्षिप्त क्रिया आहे. या अगांतुक/अवांतर प्रतिक्षिप्त क्रियेचे एक कार्य मानसिक तणावाला शारीर वाट मिळवून देणे हे आहे.

आपल्यापैकी कित्येकांनी दारूच्या गुत्त्यात धिंगाणा घालणाऱ्या दारुड्यांचे चित्र पाहिले असेल. तो धिंगाणा अतिरेकी भासावा या पद्धतीनेच दारुड्यांची चेहरेपट्टी चित्रात रेखाटलेली असते. त्यांच्या चेहऱ्याचे स्नायू आवळलेले असतात व त्यामुळे चेहरा भेसूर दिसतो. ते मांड्या उघड्या करून थोपटीत असतात. त्यांचे 'आ' वासलेले असतात व त्यातून दारूचे भपकारे बाहेर येत असतात. मनुष्याच्या शरीरात ॲड्रेनॅलिन नावाचे द्रव्य (हार्मोन) पाझरत असते. या द्रव्यामुळे धमन्या आक्रसतात व शरीरात ताण किंवा अस्वस्थता निर्माण होते. हे गुत्त्याचे चित्र पाहताना असे वाटते की, हे सगळे दारुडे ॲड्रेनॅलिनचा परिणाम विरावा म्हणून हा धिंगाणा घालीत असावेत. त्यांचे तारवटलेले चेहरे पाहून असा समज होतो की, माजोरीपणा, त्वेष, लैंगिक संबंधाबद्दलची बेदरकारी यांचे प्रदर्शन मांडून हे लोक आपल्या दबलेल्या उमाळ्यांना वाट करून देत आहेत. या उलट आपण लक्ष्मण यांनी काढलेल्या व्यंगचित्रांच्या पुस्तकावरून नजर फिरविली तर ध्यानात येते की, गुत्त्याच्या चित्रातील चेहऱ्यांवरील रखरखीत हसणे कोणीकडे व या व्यंगचित्रातील पात्रांच्या चेहऱ्यावरील स्मितरेखा कोणी कडे! गुत्त्याच्या चित्रातील पात्रांच्या शरीरात ॲड्रेनॅलिन द्रव्याचा पूर वाहतो आहे तर लक्ष्मण यांनी चित्रित केलेल्या व्यक्तींमध्ये ॲड्रेनॅलिनचा बारकासा क्षार होऊन राहिला आहे.

विनोदाचे वेगवेगळे प्रकार आहेत. काही विनोद अगदी खडबडीत व ठोसर असतात तर काही मुलायम व सूक्ष्म असतात. माणसाच्या वाटेवर केळीचे साल टाकून त्याला आपटायचे, अशा प्रकारचे पोरकट विनोद एका टोकाला तर दुसऱ्या टोकाला मती गुंग करणारे, कोड्यासारखे विनोद. एका बाजूला माणसाला कोलमडायला लावील असा धक्का तर दुसऱ्या बाजूला मार्मिक उपरोध. कधी चुटका तर कधी चपखल सुभाषित. विनोदाचे हे नाना प्रकार ओळीने उभे केले तर सुरुवातीपासून शेवटापर्यंत जाताना भावनांचा गुंता पावला पावलावर बदलताना आढळतो. खडबडीत विनोद ऐकल्यावर जो हास्यस्फोट होतो त्यातून, जिला कोणताच उद्देश नव्हता अशी, आक्रमकता व्यक्त होते. लहान मुलांना बहुधा मलमूत्र विसर्जनासंबंधीचे विनोद आवडतात. मनुष्य वयाने कितीही असो, त्याने आपली पौगंडावस्था जपली असेल तर त्याला लैंगिक संबंधाबद्दलचे चुटके पसंत पडतात. कारण त्यातून तो परोक्षपणे विषयसुख घेतो. बिभत्स विनोदाला परपीडनाचे पाठबळ असते तर उपरोध हा पावित्र्य जपण्याच्या अभिनिवेशातून जन्माला येतो. विनोदातून व्यक्त होणारे भावनांचे गुंतडे बुद्धीला गुंगवून टाकतील इतक्या नाना बाजांचे असतात. एकेका गुंत्यात परस्परांना छेद देणाऱ्या भावनाही आढळून येतात. पण, गुंता कसाही असो, त्यात आक्रमण अगर धास्ती या दोन्ही किंवा यापैकी एक भावना असावीच लागते. आक्रमणाची ही भावना खुनशीपणा, तिरस्कार, आडपड्याने केलेला अपमान किंवा विनोदाचे लक्ष्य झालेल्या व्यक्तीविषयी सहानुभूतीचा अभाव अशा विविध रूपांतून दिसून येईल. बर्गसाँने या सर्वांचा एकत्र

अनुक्रमणिका

उल्लेख "हृदयाला क्षणैक आलेली बेशुद्ध" अशा शब्दात केला आहे.

जो नर्म विनोद असतो त्यात लपलेली आक्रमकता एखाद्या चविष्ट पदार्थात असलेल्या मिठासारखी असते-पदार्थ खारट तर लागत नाही, पण मीठ काढले तर तो बेचव नक्कीच लागेल. विनोदातील आक्रमकता काढून तिथे सहानुभूती पेरली तर तोच प्रसंग, उदा. दारुड्याचे तोंडघशी पडणे, विनोदी न राहता कारुण्यपूर्ण होतो आणि श्रोत्याचा प्रतिसाद हास्यातून नव्हे तर गहिवर वाटून व्यक्त होतो. विनोदात हा जो आक्रमकतेचा घटक असतो, विदूषकाने ज्या तटस्थ वृत्तीने विनोदातील खुनशीपणा प्रकट केलेला असतो, त्यामुळे करुणेचे पर्यवसान हास्यकारणात होते व शोकात्मकतेचे रूपांतर विडंबनात होते. विनोदातील दुष्टपणा या दोस्तीतली मस्करी होऊन समोर येतो. चार्ली चॅपलिनची झालेली फजिती पाहताना आपणास हसावे की रडावे, हे कळेनासे होते. सुसंस्कृत मनुष्य जेव्हा विनोद सांगतो तेव्हा विनोदातील आक्रमकतेने उदात्त रूप घेतलेले असते किंवा ती आक्रमकता निर्विष झालेली असते. पण लहान मुले किंवा रांगडी माणसे यांना आवडणाऱ्या चुटक्यांचे विश्लेषण केले तर असे आढळते की, त्यात क्रौर्य आणि बढाईखोरपणा यांचे प्राबल्य असते.

### (३)

विनोदाविषयीच्या सिद्धान्तांचा ऐतिहासिक आढावा घेतला तरी हेच लक्षात येते की, विनोदाविषयीचे आकलन ओबड-धोबड-पणाकडून मुलायम व सूक्ष्म होत गेले आहे. ॲरिस्टॉटलचे प्रतिपादन असे होते की, कुरूपता व विटंबना यांच्या मुळे हसू फुटते. सिसेरो हा रोमन काळातील नामांकित वक्ता व विचारवंत होता. त्याचे मत होते की, विकृती आणि हलकटपणा यातून हास्यास्पदता जन्माला येते. देकार्तचे म्हणणे होते की, आश्चर्य आणि तिटकारा यातील एक किंवा दोन्ही आणि आनंद यांचे मिश्रण म्हणजे हास्य. फ्रान्सिस बेकनने हास्यकारक गोष्टींची यादी दिली आहे व त्यातील पहिले स्थान विरूपता (डीफॉर्मिटी) हिने घेतले आहे. हॉब्जने त्याच्या 'लेव्हायथन' या ग्रंथात दिलेली हास्य-भावनेची व्याख्या अनेकदा उद्धृत केली जाते, ती अशी. "दुसऱ्यात आढळणारी, किंवा आपल्या ठिकाणीही यापूर्वी असणारी त्रुटी व तिच्या तुलनेत वर्तमानकाळी आपल्या ठिकाणी आढळणारी थोरवी याची जाणीव होऊन हसायला येते."

हसू येण्याच्या कारणांविषयी तत्त्ववेत्त्यात कितीही मतभेद असले, तरी एका बाबतीत त्या सर्वांच्यात एकमत आहे. ते म्हणजे ज्या भावनांना हास्यातून वाट मिळते त्यापैकी एक भावना "आक्रमकता" ही असतेच. आक्रमण आणि धोक्याची कल्पना केल्याने निर्माण झालेली भीती/धास्ती या जुळ्या भावना आहेत. मानस-शास्त्रज्ञ नेहमी "आक्रमण व संरक्षण" या जोड ऊर्मींबद्दल बोलतात. अचानक खोटा ठरल्याने संपली अशा तऱ्हेचा प्रसंग विनोदाचा हमखास विषय होतो. मोठ्या मनुष्याने चेहरा विद्रूप करून लहान मुलाला दाखविलेली भीती, हा विद्रूप चेहऱ्याचा मनुष्य आपलाच आहे हे समजल्यावर संपते व त्या सुटकेचे समाधान त्या मुलाच्या चेहऱ्यावर एकाएकी पसरते त्या वेळी हास्याचा नेमका स्वभाव काय आहे, हे आपल्याला नीटपणे कळते. आपल्याला असे वाटले की, हास्याचा हा स्वभाव व विनोदाचे तार्किक रूप यांचा काय संबंध? पण, थोडा विचार केला तर ध्यानात येईल की, हास्याचा स्वभाव व विनोदाची घटना यांचे रूप एकत्र आहे. ते म्हणजे मनात साचत आलेली धास्ती एकाएकी निर्मूल ठरते व हास्याच्या रूपाने वाट फुटून बाहेर पडते.

कान्टला हा बोध झालेला होता की, 'ताणलेल्या अपेक्षा जेव्हा एका रितेपणात संपतात' तेव्हा हास्य निर्माण होते. शरीरात जी अतिरिक्त ऊर्जा निर्माण होते तिला हसण्यातून विसर्जित का करावे लागते याचा शोध घेताना फ्रॉइड सांगतो, "मनुष्याच्या आयुष्यात हसणे प्रथम केव्हा दिसून येते? अतीव समाधानाने तान्हे बाळ आईच्या स्तनापासून, अर्धवट झोपेत, तोंड बाजूला








करताना तोंडाची टोके खाली-वर वाकवते, तेव्हा, 'झाले, माझे पोट भरले, मला आता अगदी निश्चयाने आणखी काही नको, बस्स', हे सांगण्याची बाळाची ती शैली असते... भरपेट अन्न घेतल्याने वाटलेला 'मस्त'पणा हाच, हास्याचा मूलभूत प्रकार जो स्मित आणि मनाला पडलेला ताण शिथिल करताना निर्माण होणारे हास्याचे विविध नमुने, यांच्यातील समान घटक आहे." दुसऱ्या शब्दात सांगायचे तर, स्मित करण्यासाठी तान्हेपणी होणारे स्नायूंचे आकुंचन हे आपण तणावापासून मुक्त झालो आहोत असे दाखविण्याचा पहिला प्रयत्न असतो व याच प्रयत्नापासून हास्याच्या पुढील पायऱ्या संभवतात आणि त्या पायऱ्या देखील तणावापासून मुक्ती मिळविण्याच्या वेगवेगळ्या वाटाच असतात. स्फोटक हास्य हे अतिरिक्त मनस्तापाला विझविण्यासाठी निर्माण होते आणि तणावाखाली वावरणारी माणसे जे हावभाव करतात त्यामागेही ताण कमी करण्याचाच उद्देश असतो.

कधी कधी असे दिसून येते की, ज्या प्रेरकाला प्रतिसाद म्हणून हास्याचा स्फोट झालेला असतो, तो प्रेरक अगदीच शुष्क असतो. म्हणजे हसण्याचे जर माप घेता आले तर हसणे मूळ प्रेरकाच्या कितीतरी पटीने जास्त भरेल असे वाटते. असे का होते? आपण इथे हे लक्षात घेतले पाहिजे की, मनात भावनांचे कल्लोळ सतत दाटलेले असतात. आपल्या अबोध मनामध्ये हे कल्लोळ आपल्या विवेकाने दाबून बसवलेले असतात. परपीडन, हिंसा, भराला आलेल्या लिंगवासना, भीती आणि कंटाळा अशा भावना व विकार अबोध मनात खदखदत असतात. विनोदाच्या योगाने ह्या भावनांना दाबून टाकत राहिलेल्या विवेकाची सावधानता थोडी तरी सैल पडली जरी हा भावनांचा कल्लोळ उसळी मारून वर येतो आणि हसण्याचा गडगडाट होतो. आपण जर जमावात असू तर, हसणे ही सांसर्गिक क्रिया असल्याने, एकाच्या पाठोपाठ दुसरा या क्रमाने हास्याचे मजले वाढत जातात. पुष्कळदा असेही होते की, प्रत्यक्ष विनोद व्हावा लागत नाही; विनोदाचा संकेत देणारी वस्तू दिसली, तरी हसायला येते. दामुअण्णा मालवणकरांचा तिरळा डोळा, चिमणरावाची तिरकी फेज कॅप, चार्ली चॅपलिनचे बूट या गोष्टी मनश्चक्षूंसमोर आल्या तरी त्या वस्तूंशी जडलेले विविध विनोदी प्रसंग आठवून हसू फुटते.

(४)

आपण विनोदाची तार्किक रचना पाहिली. नंतर विनोदाला जे भावनांचे अस्तर असते त्याचाही अभ्यास केला. या दोन्ही गोष्टी शेजारी ठेवल्यानंतर आपल्याला जो बोध होतो तो शब्दात असा मांडता येईल. एखादा प्रसंग किंवा कल्पना एकाच वेळी दोन स्वतःच्या ठिकाणी सुसंगत अशा संदर्भ - चौकटीत ठेवण्याचा प्रयत्न विनोदात केलेला असतो. परिणामी, एका चौकटीत चाललेली विचारयात्रा अचानकपणे उचलून दुसऱ्या चौकटीत नेली जाते. एका चौकटीत ही विचारयात्रा फिरत असताना आपल्या मनात अपेक्षांचा कल्लोळ निर्माण होत असतो. पण विचारयात्रा अचानकपणे दुसऱ्या चौकटीत नेऊन सोडून दिल्यावर या कल्लोळाला काहीच अधिष्ठान उरत नाही; आणि हा कल्लोळ हास्याच्या रूपाने विसर्जित होतो. आपण घेतलेल्या उदाहरणातील सरदारसाहेब दिवाणखान्यातील पाटावर बसून सत्यनारायणाची पोथी वाचू लागतात तेव्हा आपली बुद्धी एक गिरकी खाते व वैवाहिक नीतिमत्तेच्या चौकटीतून बाहेर पडून श्रमविभागाच्या चौकटीत शिरते; पण विनोदाच्या पूर्वार्धातील शृंगारिक प्रसंगाने विनोद ऐकणाऱ्याच्या किंवा वाचणाऱ्याच्या मनात जी कामभावना उसळलेली असते तिला श्रमविभागाच्या नव्या चौकटीत जागाच नसते. बुद्धीची सोबत संपल्याने ही कामभावना आधारहीन होऊन, टाचणी टोचलेल्या फुग्यातून हवा बाहेर पडावी तशी, हसण्याच्या स्वरूपात बाहेर पडते.

निराळ्या शब्दात सांगायचे तर, आपली विचारशक्ती जितकी चपळ आहे तितकी आपली भावना चपळ नाही. त्यामुळे विचार झटक्याने एका चौकटीतून दुसऱ्या चौकटीत जातात पण भावना मागे रेंगाळतात.

शरीरशास्त्रज्ञ सांगतात की, आपली आक्रमणाची भावना तिचे कार्य जाति-आनुवंशिकतेच्या कालक्रमाप्रमाणे अधिक जुनाट व जड अशा मज्जासंस्थेच्या मार्फत करते तर भाषा व तर्क यांचे कार्य मनुष्याच्या नव्या मेंदूच्या मार्फत चालते. भाषा, कल्पना, तर्क यांची चपळाई व भावनांचे मांद्य यांच्यातील तफावतीचा अनुभव आपणाला दररोज घडी घडी येत असतो. आपल्या ॲड्रेनल द्रव्यातून आपल्यावर एका अर्थाने 'विषा'ची फवारणी होत असते. एखादा मनुष्य खप्पा होऊन किंवा फुरंगटून बसला असेल तर त्याला त्या मनस्थितीतून बाहेर आणायला किती मनधरणी करावी लागते आणि किती वेळ खर्चावा लागतो! भीती किंवा क्रोध या भावनांचा माणसावरील अंमल, त्या भावनांची प्रेरके नाहीशी झाली तरी, मनावर बराच वेळ चालत राहातो. विचारांइतक्याच चापल्याने आपल्या भावना बदलत असत्या तर, कदाचित् विनोदाला वावच राहिला नसता. पण विचार व भावना यांच्या चाली सारख्या वेगाने होत नसल्याने त्या दोघांची संगती तुटते व सैरभैर झालेली भावना हास्याच्या रूपाने विझून जाते.

विज्ञानातील सृजनाचे विनोदाच्या निर्मितीशी जवळचे नाते आहे. विज्ञानातील नवनिर्मितीत आपण ज्ञानाची, पूर्वी परस्परांशी अजिबात संबंध नसलेली, क्षेत्रे एकत्र आणतो आणि त्यांची अशी जुळणी करतो की, नव्याने बनलेले क्षेत्र पूर्वीच्या दोन क्षेत्रातील समृद्धींच्या बेरजेपेक्षा अधिक समृद्धीने डवरलेले असते. याचे कारण असे दिसते की, नवीन ज्ञानशाखेत पूर्वीच्या शाखा नुसत्या जवळ येत नाहीत तर त्या दोन शाखात नाते संबंध जुळतात व या नाते-संबंधाच्या आधिक्यामुळे नवीन ज्ञानशाखेला अतिरिक्त समृद्धी लाभते. पण हा विचार पुढे कधी तरी करू.

(आधारित.)

✵ ✵ ✵



अनुक्रमणिका











# संगीत समीक्षेचे विदग्ध रूप

अ० द० मराठे

श्री. दत्ता मारुलकर हे संगीताच्या क्षेत्रात रसिक, जाणकार आणि समीक्षक या नात्याने चार तपे तरी वावरत आहेत. या काळात त्यांचा अनेक गायकगायिकांशी वैयक्तिक पातळीवर संबंध आला. अनेक मैफिलींची त्यांनी वृत्तपत्रांमधून परीक्षणे लिहिली. मात्र या क्षेत्रातील विषयांवरील पुस्तकलेखनाकडे ते उशिरा वळले. 'गानसरस्वती' हा त्यांचा (अद्याप) एकमेव चरित्रग्रंथ. तो लेखनासाठीही गाजला आणि लेखनबाह्य कारणांसाठीही गाजवला गेला. यापूर्वी त्यांचे 'स्वरानुबंध' हे अठरा गायकांचा परिचय करून देणारे पुस्तक प्रसिद्ध होऊन गेले होते. आता सात गायकांच्या चरित्राचा सांगितिक तपस्येचा आणि गायकीचा वेध घेणारे 'स्वरहिंदोळे' हे पुस्तक प्रकाशित झाले आहे.

हिंदोळा हे अनिश्चिततेचे प्रतीक आहे. या सातही गायकांच्या जीवनात ही दोलायमान अवस्था पुरेपूर आली आहे. जितेंद्र अभिषेकींना गोव्यातील भौतिकदृष्ट्या संपन्न जीवन सोडून गायनकलेच्या अभ्यासासाठी पुण्यात माधुकरी मागावी लागली. त्यामुळे तारुण्याच्या उंबरठ्यावर उभ्या असण्याच्या काळात तृप्तीची भावनाच स्वतःपासून दुरावली आहे असे त्यांना सारखे जाणवू लागले होते. आवाज फुटण्याचा धोका निर्माण झाला होता. मुंबईतील जीवन खडतर होते. पण केसरबाईंनी घेतलेली काळजी त्यांच्या विद्यार्जन प्रवृत्तीला प्रोत्साहित करणारी ठरली. आकाशवाणीतील नोकरी आर्थिक व मानसिक स्वास्थ्य देणारी ठरली. मल्लिकार्जुन मन्सूर यांना संगीत शिकण्यासाठी बालपणापासून अपार मानसिक क्लेश झाले. पुढील काळात आता पुढे मंजीखाँच्या सौंदर्यवादी गायनाचा लाभ होणार असे वाटत असतानाच मंजीखाँ अचानक मरण पावले. भूर्जीखाँकडे शिक्षण घेऊ लागले तर त्यांचेही निधन झाले. गुर्टू त्यातल्या त्यात सुदैवी दिसतात. माणिक वर्मा यांच्या आई हिराबाई दादरकर यांनी सदाशिव पेठेत सनातनी कर्मठ वातावरणाचे सोसता येणार नाहीत असे तडाखे पचवले होते. पण त्यामुळे माणिकबाईंना सायंकाळी सहाच्या आत घरी येण्याचा नियम पाळावा लागला. खेळणे, शाळेतून रमतगमत, खेळत बागडत येणे अनुभवताच आले नाही. उत्तरायुष्यात भयानक आजारपण आणि त्यातून बरे करणारे सुखद स्वरांदोलन आले. संगीत साधनेच्या काळात मात्र अफाट विघ्ने आली नाहीत. कुमार गंधर्वांना तर क्षयासारख्या (त्याकाळी) भीषण ठरणाऱ्या रोगाने अनेक वर्षे संगीतापासून दूर ठेवले. 'पाऊल पुढे टाकले तर पायाखालची जमीन आपोआप मागे सरकते' याचा जितेंद्र अभिषेकींना चांगला अनुभव आला. मोगुबाई कुर्डीकरांची जमीन सतत पुढे सरकत होती. आपल्या पत्रिकेत खंडित शिक्षणाचा योगच प्रबळ आहे असेच त्यांना सतत अनुभव येत होते. वसंतराव देशपांडे पाऊल कधी टाकतात यासाठी जमीनच थांबली होती; पण त्यांच्या पायात नोकरीची अवघड आणि अवजड बेडी अडकली होती. मात्र या हिंदोळ्याची दुसरी गतीही सर्वांच्या आयुष्यात आली. हिंदोळा हे आनंदक्रीडेचे सुद्धा साधन आहे; पण संपन्न जीवनात! या गायकांनी ही भौतिक संपन्नतासुद्धा मिळवली. अशा वेळी जुन्या दोलायमानतेच्या स्मरणरंजनाचा आनंदही त्यांनी अनुभवला असेल. 'सुरांचं जीवन हे असुरक्षित जीवन आहे' याची कल्पना मोगुबाईंना जयश्रीबाईंनी दिली होती. सुरांच्या विश्वातील या सत्याचे दाहक अनुभव सर्वांनी पूर्वायुष्यात अनुभवले. स्वरांच्या जगात जगणाऱ्यां-विषयीच्या या पुस्तकाला स्वरहिंदोळे हे नाव अत्यंत सार्थ आहे. या गायकांच्या स्वरांच्या हिंदोळ्यावर बसण्याचा










आनंद ज्यांनी सदैव लुटला त्या रसिकांच्या दृष्टीने सुद्धा हे नाव सार्थ आहे.

हे पुस्तक हा गानतपस्येचा वेध आहे. त्यामुळे त्यात किस्सेबाजीला आणि सनसनाटीपणाला वाव नाही. ३०० वर्षांपूर्वी गायकांना गुणीजन म्हणत असत. ही एक जातच झाल्यासारखी होती. तीत वेश्या किंवा वेश्यासदृश्य स्त्रिया असत. या गोष्टींना हजार वर्षांची तरी परंपरा आहे. मृच्छकटिक नाटकाच्या चौथ्या अंकात अशा मंडळींचा 'बंधुल' असा उल्लेख आहे. अशा कित्येक व्यक्तींनी स्वकर्तृत्वाने आपले नाव कला संस्कृतीत अमर केले आहे. सांगायचा मुद्दा हा की एखाद्या सामान्य लेखकाने अशा स्वरूपाच्या पुस्तकात काही 'जागा' घेतल्या असत्या: मुसलमानी राजवटीत भारतात अनेक जातींचे उन्नयन झाले आणि ते हिंदू समाजाने स्वीकारले. हा इतिहास मारुलकरांना कदाचित माहीत नसेल पण; कोणत्या 'जागा' घ्यायच्या नाहीत याचे त्यांना सामाजिक व सांस्कृतिक भान पक्के आहे. हा त्यांच्या लेखनाचा उज्ज्वल गुण आहे. जितेंद्र अभिषेकी नाट्यसंगीताच्या क्षेत्रात तेरा वर्षे उपेक्षित राहिले. मारुलकर याचा दोनदा उल्लेख करतात. उपेक्षेमागची कारणे कदाचित् त्यांना माहीत असतील. पण ही 'घ्यायची जागा' नाही हे त्यांना अधिक माहीत आहे. वाचकांच्या रोगट कुतूहलाला खाद्य पुरवायचे नाही. गायकाच्या मेहनतीवर आणि सिद्धीवरच लक्ष्य ठेवायचे हा मारुलकरांचा स्वभाव आहे. त्यामुळे या लेखनाचे केंद्र नेहमीच गुणवत्तेची कमाई आणि गुणविश्लेषण हेच आहे. मुंबईत गायकाला रियाजासाठी स्वतंत्र खोली मिळणे अशक्य. यावर मारुलकर म्हणतात - 'गानगुरूंच्याकडून शिकावयास मिळालेल्या सर्व गोष्टी, त्या पचविण्यासाठी हवे असणारे मननचिंतन, गायनरियाजाचे सातत्य व स्वत:मधील अंगभूत प्रतिभेच्या आनंदाचा सुखद आविष्कार हा जीवन-साधनेचा विषय आहे ही जाणीवही जितेंद्र अभिषेकी यांना झाली ती याच खोलीत.' इथे मारुलकरांच्या लेखनाचा केंद्रबिंदू दिसतो आणि तो कधीही ढळत नाहीत. मात्र काही गोष्टी अशा आहेत की, ज्यांची निरुपद्रवी पण रंजक माहिती मारुलकर आवर्जून देतात. उदा. दादरा ठुमरीच्या प्रसिद्ध गायिका निर्मला अरुण (आजचे प्रसिद्ध सिनेकलावंत गोविंदा यांच्या मातुश्री), उषा पंडित (देवकी पंडीत यांच्या मातोश्री), दीपा कार्लेकर (पूर्वाश्रमीच्या वासंती रानडे), इनायतखाँ म्हणजे श्रीमती ज्योत्स्ना भोळे यांचा गुरू; कुमारजींनी कौशी हा राग ऐकवला (पं.जगन्नाथबुवा यांची ही निर्मिती).

सर्व गायिकांचा उल्लेख मारुलकर त्यांच्या नावापुढे ताई किंवा बाई हा आदरवाचक शब्द जोडूनच करतात. कोणाशी आपली सलगी दाखवण्यासाठी एकेरी उल्लेख, टोपणनावांचा वारंवार उल्लेख ते करीत नाहीत.

लेखनात गायकांसाठी मारुलकरांनी वापरलेली विशेषणें मारुलकरांच्या विवेचनाचे स्वरूप स्पष्ट करतात. त्यातील अनेक विशेषणे त्यांनी स्वत: निर्माण केली आहेत आणि मारुलकरांच्या या भाषेने संगीतसमीक्षेला बौद्धिक पातळीवर नेऊन विदग्ध रूप दिले आहे.

सा) जितेंद्र अभिषेकी - बुद्धिवादी गायक, ज्ञाता कलावंत, गोड गळा आणि लगोलग (गायकीची) भाषा अवगत करण्याची हातोटी, गुरुत्व लाभलेला थोर कलावंत, रंगतदार मैफलीचा ख्याल गायक व स्वररचनाकार.

ग) माणिक वर्मा - अत्यंत आकर्षक, श्रवणीय बसकटपणा हा लक्ष वेधून घेणारा गुण, शांत करुणरसाला पोषक अशी आवाजाची धार, आर्जव, स्वरांची गोलाई व बरोबरीला अत्यंत सात्त्विक, सुसंस्कृत एक सुंदर घरगुतीपणा, संस्कारित आवाज, अभ्यास केलेला आवाज, ललित संगीतातील कुठलीही जागा सहजपणे काढू शकणारा आवाज, शास्त्रीय संगीत उत्तमपणे गाऊ शकणारा वजनदार भारदस्त गळा.

म) मल्लिकार्जुन - स्वरांवरील अर्जित सामर्थ्य.








प) शोभा गुर्टू - मांडणीतील विचार.

नि) कुमार गंधर्व - कलात्मक प्रौढत्व.

गायकी, मैफिली यांच्या वर्णनात रसिकता, जाणकारी, शब्दयोजना आणि जाणवेल न जाणवेल अशी भावुकता किंवा गायकांसंबंधी आपुलकी यांचा प्रसन्न अनुभव मारुलकर देतात.

सा) जितेंद्र अभिषेकी - मैफिलीची सुरुवात अत्यंत शांतपणे होत असे. बंदिस्त चीज, संथ आणि शिस्तवार आलापचारी, रागस्वरूपाचे शुद्धत्व, अत्यंत परिणामकारक बढत. बोलउपज अंगाचा अत्यंत व्यवस्थित उपयोग आणि शेवटी आक्रमक जाणवणारी तानक्रिया - गायकीत प्रथमदर्शनी सामोरे येणारे (हे) गुण.

बंदिशीतील गानपोषक तत्त्वांचा सांभाळ करणे, रागविस्तार हा बंदिशीच्या रूपातच दडवलेला असतो याचे भान ठेवणे, रागविस्ताराची दिशा तुम्हाला बंदिशच दाखवते हे त्रिसूत्री तंत्र अभिषेकी यांच्या मैफिलीतं कधीही सुटलेले नव्हते. गायनात बंदिश काय सांगते याचे विवेचन मांडणीत होत असे. बंदिशीतील शब्द व त्यांचे उच्चार यातूनच अर्थाची जाणीव रसिकांना होत असे. बंदिश केंद्रीभूत ठेवून रागमांडणी व विस्तार करण्याची पद्धत, कलात्मक विस्ताराला मांडणीत दिलेले महत्त्व, या सर्व गोष्टींमुळे मांडणीचा स्तर बराच उंचावत असे. शब्द, भाव, अर्थ, भावना याही अभिषेकींच्या मैफलीत बलस्थाने.

रे) वसंतराव देशपांडे यांचे गायनाचे कार्यक्रम सप्रूहाऊससारख्या भव्य सभागृहात आयोजित केलेले होते. असे तीन ते चार कार्यक्रम झाले पण... घरातील दिवाणखान्यातील बैठक रंगतीचा जो स्तर गाठीत असे तो स्तर सप्रूहाऊसमधील गायनाने कधीच गाठलेला नव्हता.

ग) माणिकताईंचं गाणं हे विशिष्ट घराण्याचं असं कधीच वाटत नसे. अगदी बारीक लक्ष दिलं तर थोडासा खुशबू सुरेशबाबूंच्या गायकीचा आढळतो. मात्र प्रांजळपणे असं म्हणावंसं वाटतं की, त्यांच्या गायनात जो गोडवा आहे तो आईचाच. हिराबाई दादरकरांच्या गायनाचाच वारसा आहे. आईचं वात्सल्य हेच माणिकताईंचं गाणं आहे.

मारुलकरांचा हा अधिकारातून आलेला अभिप्राय आहे. यातील खुशबू हा शब्द त्यांची रसिकता दाखवतो. तर शेवटचे वाक्य थोडा भावुकतेला स्पर्श करते.

'सांगू कशी ग मनाची व्यथा ही' किंवा 'त्या चित्तचोरट्याला' या गझला बनारस लाहोरच्या धाग्यातून विणलेल्या जाणवतात. आणि माणिकताईंच्या आवाजातून त्या आर्जवांनी काठोकाठ भरलेल्या जाणवतात. हे आर्जव मात्र खास माणिकताईंचंच.

चाल स्वतःच्या गळ्यात स्थापित करणं म्हणजे स्वररचनाकारांनी त्या गीतातील शब्दांना दिलेले सूर जसेच्या तसे म्हणणं म्हणजे सुरावट शिकणं नव्हे. गीतकाराला जे भाव त्या गीतातून व्यक्त करायचे आहेत त्या भावाला स्वरनियोजकांनी ज्या जाणिवेतून स्वरलयींचं पांघरूण घातलं आहे त्या गोष्टी एकजीव होणारे संबंध लक्षात घ्यायचे असतात. हे तत्त्व माणिकताईंनी आयुष्यभर जपलेलं होतं.

प) शोभा गुर्टू - मैफिलीत राग बदलत, गजल बदलत, चैती, कजरी, होरी याही बदलत असत. बदलत नसे ती एकच गोष्ट. विलक्षण सामर्थ्यवान् स्वर. त्या स्वरावरील निष्ठा, समर्पित भाव आणि लागणाऱ्या षड्जाचे सौंदर्य. स्वरविश्वात वावरणारी, स्वतः चिंब भिजलेली व रसिकांना भिजवणारी प्रसन्न गायिका शोभा गुर्टु मैफिलीत स्वरांना आमंत्रित करीत तेच मुळी आर्जवी स्वरात. सामोऱ्या आलेल्या स्वरांचे स्वागत देखील निरामय लीनतेतून होई. जिथे मांडणीतील विचार संपतात तिथे ख्याल संपलेला असे. लोकांना हवं हवं असं वाटतं न वाटतं तोच गात असलेला कोणताही गानप्रकार त्या संपवीत असत.

'सावनकी ऋतु आयी रे सजनीया' ही कजरी








ऐकत असताना मुळातला देस तर आनंद देतच असे पण गाता गाता रसिकांना 'मिया मल्हार' स्वरसमूहातूनही त्या हिंडवून आणीत. हे कमी म्हणूनच की काय 'वृंदावन सारंग'ची घट्ट चौकट बंदिशीभोवती टाकून त्या हळुवारपणे पण विलक्षण आत्मविश्वासाने देसच्या आधी निर्माण केलेल्या वास्तूत रसिकांना आणून सोडत. हे सर्व ज्या स्वरांना बरोबर घेऊन त्या स्वरकाम करीत त्यामध्ये कधीकधी आंजारणे, गोंजारणे, हळुवारपणे होणारे स्वरस्पर्श आणि स्वरस्थानावरील अचूकता हे सर्व गुणविशेष सामोरे येत.

या लेखनातील 'स्वरसमूहातून हिंडवून आणीत', 'वृंदावन सारंगाची बंदिशीभोवती घट्ट चौकट', 'देसची आधी निर्माण केलेली वास्तू' 'स्वरांना आंजारणे गोंजारणे' हे शब्दप्रयोग वैशिष्ट्यपूर्ण आहेत. तरल स्वर आणि त्यांच्या वर्णनात येणारी जड प्रतिमाने आणि हालचाली संगीतसमीक्षेच्या भाषेला अभिव्यक्तीची एक रीती देत आहेत. एखाद्या साहित्यकृतीचे वा. ल. आणि व. दि. कुलकर्णी यांनी विश्लेषण, आस्वादन यांनी युक्त समीक्षण करावे तसे मारुलकरांनी संगीताचे समीक्षण आजवर केले आहे. त्यासाठी त्यांनी समीक्षेला एक अत्यंत सुंदर आणि विदग्ध रीती दिली आहे. त्यामुळे त्यांचे संगीतसमीक्षेचे लेखन वाचकांना आनंद देत आले आहे. अभिषेकींच्या नाट्यसंगीताचे विवेचन, वसंतराव देशपांडे आणि बेगम अख्तर यांच्यातील स्नेहबंध, माणिक वर्मांनी गायलेले 'बलसागर तुम्ही वीरशिरोमणी' हे पिलु रागातील पद, मल्लिकार्जुनांनी रंगवलेली प्रातःकालीन गायनाची मैफल, शोभा गुर्टूंच्या मैफिलीचे वर्णन हे सर्व पुन्हा पुन्हा वाचावे असे आहे. विशेषतः होतकरू गायकांनी. मारुलकरांनी संगीत समीक्षेला बौद्धिक आणि भाषिक अशी एक उंची मिळवून दिली आहे.

संगीत हे बारा स्तरांच्या तरल माध्यमांचे क्षेत्र आहे. त्यात संचार करणाऱ्यांची श्रवणशक्ती सूक्ष्म असावी लागते. त्यामुळेच असेल कदाचित् पण शास्त्रीय संगीताची आवड आणि बुद्धिमत्ता यांचा अतिशय जवळचा संबंध आहे. मारुलकरांच्या बाबतीत या दोन्ही क्षमता स्पष्ट दिसून येतात त्या त्यांच्या विश्लेषण शैलीत आणि संक्षिप्त लेखन करण्याच्या शैलीत. स्वरांचा लगाव अचूक असावा तसे मारुलकरांचे शब्द अचूक असतात. त्यात फाफटपसारा आणि फुलोरा नाही. इतर जे दहा ओळीत सांगतील ते ते एका ओळीत सांगतात. 'उर्दू आणि हिंदीचा अभ्यास जाणकारीने केलेल्या या अलाहाबादी माणसानं हे माणिकताईंचे उच्चार सुधारले होते.' या एका वाक्यात किती घटना आणि तपशील येतात ते बघण्यासारखे आहे. गायकांची वैशिष्ट्ये, शैली यांचे त्यांनी केलेले वर्णन साहित्याच्या अर्थगौरव या गुणात मोडते. उदा. १. आंतरिक मनाची बेचैनी जशी ते (अभिषेकी) स्वरप्रकटीकरणातून हलकी करीत असत तद्वत् शब्दसमूहाच्या लिखाणातून त्यांच्यामध्ये दडलेला लेखक अधूनमधून डोके वर काढीत असे. २. प्रेमापेक्षा संताप व्यक्त करणारा कलावंत सांभाळणे हे अभिषेकी यांच्या पत्नीला लग्नानंतर सुरुवातीला जड गेले. ३. विद्येतील पवित्रता आणि त्या पवित्रतेसाठी गुरूचे (नीलकंठबुवांचे) कष्ट हेही मल्लिकार्जुन यांच्या लक्षात आले. ४. दैवयोग बघा, घर बदललं, घराणं बदललं, मात्र खंडित तालमीचा योग मोगूबाईंना बदलता आला नाही. ५. आजारपणात पडून राहण्याचा काळ या बुद्धिवादी गायकाने वैचारिक रियाज करण्यात घालवला होता.

मारुलकर अनेकदा व्यावहारिक सत्य सांगून जातात. त्यावेळी त्यांची अभिव्यक्ती ठाशीव असते. १. मधुकरीवृत्तीचा आनंद वेगळा अन् पोटासाठीची मधुकरी वेगळी. २. कोणतीही अर्धवट गोष्ट कधीही उपयोगी पडणार नाही. अर्धवट ज्ञान तर कधीच नाही. ३. तयार कलावंत हा मूळ कलासाधक, गुरू आणि ईश्वरी प्रसाद अशा तीन घटकांचा परिपाक असावा लागतो,

चरित्रात्मक लेखनात उतरणारा दोष म्हणजे चरित्रविषय बनलेल्या व्यक्तीशी आपली जवळीक किती

आहे हे दाखवण्याचा मोह. याची दुसरी बाजू आहे त्या व्यक्तीविषयी खुलवून सांगण्यात येणारे भाकड किस्से. मारुलकरांची मुळातच ही वृत्ती नाही. ते मैफिलीचं वर्णन जसं शास्त्राधारे पण लालित्यपूर्ण करतात तसं गायकांचं व्यक्तिमत्त्वही थोडक्यात पण मार्मिकपणे सांगतात. जितेंद्र अभिषेकी देखणे होते. याचे वर्णन करताना मारुलकरांचा केंद्रबिंदू (फोकसिंग पॉईंट) कुठे असतो हे बघण्यासारखे आहे. 'कलावंताच्या नजरेतील विश्वास, त्याची निर्भयता या गोष्टींचा परिणाम हा मोठ्या प्रमाणात रसिकांवर होतो.' हे आहे सामान्य सत्य. त्याचं विशिष्ट स्वरूप अभिषेकी. याविषयी ते असं सांगतात, 'व्यायामानं कमवलेली शरीरयष्टी, आकर्षक चेहऱ्यावरील करारी भाव, दीर्घ ज्ञानार्जनातील तपश्चर्येचा आत्मविश्वास रसिकांना प्रसन्न करणारा होता.'

भावुकतेचा संयत आणि प्रमाणात केलेला वापर अधिक परिणामकारक होत असतो. 'डिसेंबरच्या तिसऱ्या आठवड्यात माणिकताईंनी डोळे उघडले व काही क्षणातच तोंड उघडले. स्वतःच्या आवाजाची खात्री करून घेणारी ही गायिका शरीरानं पूर्ण थकली होती. एवढ्या मोठ्या व्याधीलासुद्धा तिच्या आवाजाला धक्का लावायची हिंमत झाली नाही.'

'त्यांच्या जाण्यानं आम्ही काय गमावलं आहे याचा अंदाज येत नाही. एवढं निश्चित की मल्लिकार्जुन यांनी आमच्या संगीत परंपरेवर जे संस्कार केले आहेत तसे पुढे कुणी करतील का? हा प्रश्न आणि उत्तराच्या शोधात आम्ही आहोत आणि एवढंच आता शिल्लक आहे.'

सातारकर स्त्री नाटक मंडळीमध्ये जाण्यासाठी मोगुबाई घर कायमचे सोडतात तो प्रसंगही त्या दृष्टीने वाचनीय आहे.

संक्षेपाने नेमके चित्र उभी करण्याची मारुलकरांची वृत्ती पुढील दोन उदाहरणांनी स्पष्ट होईल. 'सभोवताली लखलखणारे असंख्य दिवे प्रकाश उधळीत होते. मात्र सोज्वळ स्वरांचा नंदादीप मावळल्यामुळे डोळ्यांपुढे असणारा प्रकाशच नाहीसा झाला होता.'

'अर्जित ज्ञानाने तेजाळलेला (मोगुबाईंचा) चेहरा मात्र तसाच प्रसन्न दिसत होता'

विवेचनाच्या ओघात आलेले अर्थांतर-न्यासदृश एक वाक्य आहे. 'तंबोरा बोधिवृक्षासारखा आहे. तपस्येनंतर तोच तुम्हाला खऱ्या स्वरांची ओळख करून देतो.'

प्रसिद्ध व्यक्तींच्या चरित्रात काही सामान्य घटना घडतात आणि त्यांना पुढे फार महत्त्व दिले जाते. वास्तवाचे भान असणारा लेखक अशा गोष्टींकडे एक शक्यता म्हणून बघतो. 'सुरेशबाबूंना लाभलेली ही शिष्या (माणिक वर्मा) पुढे फार मोठी गायिका होणार याची जणू त्या ज्ञात्या गुरूला कल्पना आली असावी.' (मोगुबाई रहात असलेल्या) खोलीवरून जाताना आपल्या गायकीसाठी योग्य आवाज आहे हा विचार अल्लादियाखाँसाहेबांच्या मनात आला असावा. रियाज करीत असताना (मोगुबाईंची) लयकारी त्यांच्या कानावर पडली असावी.

मारुलकरांच्या भाषाशैलीइतकेच या पुस्तकाचे वैशिष्ट्य आहे सतीश पाकणीकरांची छायाचित्रे. प्रत्येक फोटो त्या गायकाचे व्यक्तिमत्त्व पूर्णपणे दाखवतो. जितेंद्र अभिषेकींचे सर्वांगाने चाललेले गायन, मल्लिकार्जुनांची घाई, शोभा गुर्टुंची तल्लीनता, सर्वच प्रेक्षणीय. मल्लिकार्जुनांची जितकी घाई दिसते तितकेच त्यांच्या साथीदार शैला दातार यांच्या चेहऱ्यावरचे 'ही घाई आजची नव्हे, आम्हांला सवय आहे सगळी' असे भाव, शोभा गुर्टुंच्या साथीदाराची आदरयुक्त तल्लीनता हेसुद्धा नजरेत भरतात. पण खरी कमाल आहे ती मोगुबाईंच्या चित्रात. डाव्या बाजूची थोडी जागा आणि पार्श्वभूमी वगळता दिसणारा पांढरा रंग मोगुबाईंच्या परिणत व्यक्तिमत्त्वाचे परिपूर्ण दर्शन घडवतो.

श्री. विश्वास दांडेकर यांची प्रस्तावना 'कला'

या घटनेची पार्श्वभूमी सांगत एका वेगळ्याच वातावरणात घेऊन जाते. भूक आणि काम या मानवाच्या दोन गरजा योग्य प्रकारे भागल्या की तो संस्कृती नावाचे गारुड तयार करतो. संस्कृतीचा उगम जैवशास्त्रीय आहे हे डेसमॉंड मॉरीसचे मत थोडक्यात सांगून दांडेकर इतिहासाचार्य राजवाडे यांच्या विचार-विकार प्रदर्शनाच्या साधनांची उत्क्रांती या निबंधाकडे येतात. गायन, चित्रण, नृत्य, मूर्तीकारण या कलांमधून पुढे काव्य, चित्रमयग्रंथ, नाटक आणि स्थापत्य या कला उत्क्रांत झाल्या. नवरसांचा आविष्कार करणारे सूर सातच का याचे उत्तर देता येत नाही. कदाचित् ते अधिकही असू शकतील किंवा कमीही. पण सात ही मानवी शक्तीची एकूण मर्यादा दिसते. शब्द व भाषा यांचा संगीताशी संबंध नाही. सात सुरांना दिलेली सा, रे, ग, इ. नावे केवळ प्रतीके आहेत. कलेचे मूर्त आणि अमूर्त असे दोन भेद आहेत. (परफॉर्मिंग आणि नॉन परफॉर्मिंग आर्ट यापेक्षा मूर्त-अमूर्त हे शब्द दांडेकरांना योग्य वाटतात.) मूर्तकलेचा पुनःप्रत्यय अनेकदा घेता येतो. अमूर्त कलेचा प्रत्यय त्याच क्षणी येतो. मात्र तो अनेकदा घेता येईल अशी ध्वनिमुद्रणाची साधने आज उपलब्ध झाली आहेत. विविध कलाप्रकार हे निसर्ग आणि माणूस यांच्या परस्पर संवादातून निर्माण होतात व विकास पावतात. संगीतातील रागनिर्मितीत हे दिसते. निसर्गसंबद्ध संगीतविश्व लोकसंगीतात पसरलेले आहे. त्याचा कुमारगंधर्वांनी रागनिर्मितीत केलेला उपयोग दांडेकर सूचित करतात. (मारुलकर तो पुढे अधिक दाखवतात) अनुवंशिकता, पर्यावरण, संधी, परंपरा, तालीम, गणगोत या आणि अशा देवाणघेवाणीतून व्यक्तिमत्त्व साकारते. (संगीतातील शैली आणि घराणी यांची विविधता यातून निर्माण होते?) कलाप्रकाराचे शास्त्र झाले की Practice, Education and Research यातून त्याची प्रगती होते. इथे प्रस्तावनेचा बौद्धिक भाग थोडा थांबतो आणि दांडेकर पुस्तकाकडे वळत त्याचे मार्मिक पण थोडक्यात विवेचन करून मारुलकरांच्या काही विधानांचा परामर्ष घेतात. बिहड भैरव या नावाचा खरा अर्थ स्पष्ट करताना ते 'बिहड'चा अर्थ देतात तो त्यांच्या मध्यभारतातील दीर्घ वास्तव्यातून येतो. या भागानंतर ते पुन्हा काम आणि भूक या प्रेरणांच्या समेवर येतात आणि भूक अशांत असल्यास काय होते किंवा काय होईल याविषयीची रवींद्रनाथ आणि गांधीजी यांच्यातील एका संवादाची गोष्ट देऊन प्रस्तावनेचा सुंदर शेवट करतात. एक जमलेली प्रस्तावना असेच येथे म्हणणे योग्य.

***

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| ❑ वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| ❑ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु. |
| ❑ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु. |
| ❑ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु. |
| ❑ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु. |
| ❑ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु. |
| ❑ तरंगयामिक व पुंजयामिक । मा. ग. टोळे | २० रु. |
| ❑ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | १५० रु. |
| ❑ वागीश्वरी । डॉ. गो. के. भट | ६० रु. |
| ❑ प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले | ५० रु. |
| ❑ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ४० रु. |
| ❑ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु. |
| ❑ दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद पाटील | १५० रु. |
| ❑ शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु. |
| ❑ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १४० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु. |
| ❑ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य | ५० रु. |
| ❑ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु. |
| ❑ पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ६० रु. |
| ❑ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | ३० रु. |
| ❑ कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य । रा. भा. पाटणकर | १०० रु. |
| ❑ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि.के. वेडेकर | ३० रु. |
| ❑ आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार | १०० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु. |
| ❑ इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | १२० रु. |
| ❑ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु. |
| ❑ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु. |
| ❑ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |
| ❑ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द.ना. धनागरे | ४० रु. |
| ❑ प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु. |
| ❑ हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु. |
| ❑ पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) । प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु. |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)

हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.



